ॐ नमो भगवते वासुदेवाय

# पापी--पुण्य

[ तीन अंकी सामाजिक नाटक ]

लेखक :

भार्गवराम विठ्ठल वरेरकर

किंमत आठ आणे

प्रकाशक :

विठ्ठल नारायण परब,
श्रीभारत नाट्य मंडळ,
रामजी पुरुषोत्तमची चाळ,
गिरगांव बॅकरोड, मुंबई ४.

पहिली आवृत्ति
७ फेब्रुवारी १९३१



मुद्रक :

पुरुषोत्तम नारायण वर्दे,
मराठा प्रिंटिंग प्रेस,
लॅमिंग्टन रोड, मुंबई नंबर ७.

शनिवार ता. २६ जुलै १९३० रोजीं संध्याकाळीं **परळ**-मुंबई येथें दामोदर ठाकरसी हॉलमध्यें या नाटकाचे पहिले दोन प्रयोग करण्यांत आले. त्या वेळीं खालील गृहस्थांनीं नाटकांत कामें केलीं :

'बाबासाहेब'— शांताराम वासुदेव तेंडुलकर.

'बाळासाहेब'—पांडुरंग लक्ष्मण देशपांडे.

'माणिकराव'—हरिश्चंद्र रामराव नवलकर, एल्. एम्. ई.

'कवि'—दत्तात्रय परशुराम तांबट.

'एडिटर'—नारायण लक्ष्मण भिसे.

'हरणी'—कृष्णराव गजानन कवळेकर. (मास्तर मोहन)

'केसर'—कृष्णराव धाकजी कोठारे.

'वत्सला'—पांडुरंग अर्जुन देवकर.

---

या पुस्तकांत घातलेले फोटोग्राफ 'रे आर्ट स्टुडिओ'चे मालक बाबुराव मुळे यांनीं घेतले आहेत.

# सिंहावलोकन

मराठी रंगभूमीवर जीं पहिलीं नाटकें आलीं त्यांच्या प्रयोगाच्या कालाला पहिल्यापासूनच मर्यादा नव्हती. अगदीं पहिलीं 'न लिहिलेलीं' पण रंगभूमीवर प्रयोग होत असलेलीं पौराणिक नाटकें सहा ते दहा तासांच्या कालावधींत होत असत. त्यानंतर दोन प्रकारचीं नाटकें रंगभूमीवर येऊं लागलीं. एक संगीत व दुसरीं गद्य. संगीत नाटकाची सुरवात कालिदासाच्या शाकुंतलाच्या भाषांतरानें झाली आणि न लिहिलेलीं नाटकें करणाऱ्या पौराणिक नाटक मंडळ्यांनीं इंग्रजी नाटकांचीं भाषांतरें करून गद्य नाटकाचा संप्रदाय सुरू केला. संगीत नाटकाच्या संप्रदायाला 'किर्लोस्कर संप्रदाय' व गद्य नाटकाच्या संप्रदायाला 'केळकर (प्रो. वासुदेव बाळकृष्ण केळकर) संप्रदाय' असें नांव देतां येईल.

किर्लोस्कर संप्रदायाच्या संगीत नाटकांत मूळ संस्कृत नाटकांतील प्रत्येक श्लोकाऐवजीं पद घातलेलें असल्यामुळें पौराणिक नाटकांनीं उभी रात्र जागविण्याची सवई झालेल्या प्रेक्षकांना कालमर्यादेचा आंखुडपणा जाणवला नाहीं पण शेक्सपीयरच्या नाटकांचीं भाषांतरें केळकरांच्या करवीं पौराणिक असलेल्या शाहूनगरवासी नाटक मंडळी मार्फत ज्या वेळीं दाखविलीं गेलीं, त्यावेळीं कालमर्यादेचा आंखुडपणा प्रेक्षकांना भासूं लागला. ती उणीव भरून काढण्यासाठीं प्रो. केळकरांनीं मोलिअर प्रभृति फ्रेंच नाटककारांचीं त्रुटित नाटकें भाषांतरित करून कालाची भरपाई करण्याचा संप्रदाय सुरू केला. यापूर्वींच पौराणिक नाटकांच्या जोडीला उभी रात्र जागविण्यासाठीं फार्स करण्याची पद्धति प्रचारांत होती. या सदरांत 'झोंपी गेलेला जागा झाला, छेलबटाऊ मोहनाराणी, बासुंदीचा फार्स, गुलाबछकडीचा फार्स, तुरेवालीचा फार्स' प्रभृति त्रुटित नाटकांचा उल्लेख करतां येईल.

या फार्सवजा जोड नाटकांचा दर्जा वाङ्मयाच्या दृष्टीनें फारच हलक्या प्रतीचा असल्यामुळें प्रो. केळकर, शंकर मोरो रानडे, हरी नारायण आपटे, शिवराम सीताराम वागळे यांनीं भाषांतरित केलेल्या फ्रेंच नाटकांच्या

रूपांतरांना फार्सांची जागा देण्यांत आली. हीं छोटीं नाटकें विनोदप्रधान असल्यामुळें स्थानमाहात्म्यानें फार्सांच्या सदरांत अकारण गोवलीं गेलीं. मराठी भाषेंतील खरीं पहिलीं त्रुटित नाटकें हींच होत. हीं नाटकें क्रमशः मनोरंजन आणि निबंधचंद्रिका, नाट्यकथार्णव व विविधज्ञानविस्तार प्रभृति मासिक पुस्तकांतून पहिल्यानें प्रसिद्ध होऊन पुढें स्वतंत्र पुस्तकरूपानेंही आलीं होतीं. पण शेक्सपीयरच्या मुख्य नाटकाशेजारीं वेळेच्या भरपाईसाठीं प्रयोगित झाल्यामुळें त्यांच्या अव्वल दर्जाची महती प्रेक्षकांना मुळींच कळली नाहीं. शेक्सपीयर संप्रदाय आणि मोलियर संप्रदाय अशा रीतीनें हातांत हात घालूनच पहिल्यानें मराठी रंगभूमीवर आला.

आरंभीं प्रयोगित झाल्यामुळें शेक्सपीयरचीं भाषांतरें ठळकपणें प्रेक्षकांच्या नजरेंत भरत असत. आणि नंतर होणारीं—लटपट्या पद्या, मारून मुटकून वैद्यबोवा, सटवाजीराव ढमाले प्रभृति—फ्रेंच नाटकें प्रेक्षकांकडून बहुधा पाहिलींसुद्धां जात नसत. मुख्य प्रेक्षकवर्ग पहिले नाटक होतांच उठून निघून जावा आणि चार आणे दोन आण्यांची बसुली करण्याचा हक्क शाबीत करणारा बहुसंख्याक प्रेक्षकवर्ग हीं त्रुटित नाटकें पहाण्यास मागे रहावा, असेंच सदोदित झालेलें दिसून येत असे. किंबहुना हा चारदोनआणेवाला प्रेक्षकवर्ग शेक्सपीयरच्या अवास्तव (unrealistic) नाटकांपेक्षां फ्रेंच नाटककारांच्या या वास्तव आणि त्रुटित नाटकांवरच खरा खूष असे.

याचवेळीं संगीत रंगभूमीवर कालिदासी नाटकांची सुरवात झाली होती. नाट्यवस्तूच्या दृष्टीनें पाहातां हीं नाटकें बहुतांशीं शेक्सपीयरच्या जातीचीं म्हणजे कल्पनाप्रधान (Melodramatic) होतीं. मूळ परंपरा ही असल्यामुळें शेक्सपीयरची अवास्तव चकाकी मराठी प्रेक्षकांच्या सहज पचनीं पडली; आणि एका बाजूला कालिदास व एका बाजूला शेक्सपीयर या दोघांना हातीं धरून मराठी नाट्यवाङ्मय निर्माण होऊं लागलें.

व्यापारी या नात्यानें शिरकाव करून राज्य कमाबण्याची इच्छा धरणाऱ्या कंपनीसरकारसारखा मराठी रंगभूमीवर प्रवेश करून तिचें साम्राज्य पटकावण्याची संधि पहाणारा मोलियरहि रंगभूमीच्या प्रांतांत कोनाकोंपऱ्यांत टपून बसला होता, तोहि वेळ येतांच पुढें सरसावला.

किर्लोस्करांचेच अनुकरण करून डोंगरे यांनी उभ्या रात्रीला पुरणारीं

संगीत नाटकें सुरू केलीं होतीं. परंतु किर्लोस्करांपुढें त्यांचें तेज पडलें नाहीं. सूर्याच्या प्रकाशानें प्रकाशित होणाऱ्या चंद्राप्रमाणें किर्लोस्करांच्या पावलावर पाऊल टाकून देवल हे किर्लोस्करांच्याच आश्रयाखालीं अस्तित्वांत येऊं लागले. त्यांचीं नाटकें बहुतेक सर्व संस्कृताचीं भाषांतरें असल्यामुळें कालिदासी संप्रदायांत पचलीं गेलीं. मृच्छकटिक नाटकाची रंगावृत्ति काढतांना देखील मृच्छकटिकांतील मोलियरीभागाला छाट देऊन त्यांनीं कालिदासी भाग शिल्लक ठेविल्यानें मृच्छकटिककाराची खरी वास्तवता अंधारांत टाकण्याची त्यांनीं अरसिकता दाखविली, त्यामुळें मराठी रंगभूमीला मृच्छकटिक नाटकासारख्या वास्तव नाटकानें जें एक निराळें वळण लागणार होतें, तेंहि दुरावलें. गद्य नाटकांत देखील त्यांनीं शेक्सपीयरी संप्रदायांतील झुंझारराव व दुर्गा हीं दोन इंग्रजी नाटकांचीं रूपांतरें रंगभूमीवर आणलीं. पण देवलांचें नांव रंगभूमीवर टिकून राहाण्यास मोलिअर संप्रदायांतील All in the wrong या नाटकाचें ‘ फाल्गुनराव ( संशयकल्लोळ )’ हें रूपांतरच कारणीभूत झालें; किंबहुना त्यांचें स्वतंत्र रीतीनें लिहिलेलें एकटेंच शारदा नाटकही या मोलियर संप्रदायांतूनच जन्माला आलें आणि म्हणूनच तें यशस्वी होऊन वास्तव नाटकांच्या यादींत टिकून राहिलें.

किर्लोस्करांचें लोकप्रिय झालेलें पहिलें नाटक ‘ शाकुंतल ’ जरी रंगभूमीवर संगीत संप्रदाय निर्माण करण्यास कारणीभूत झालें होतें, तरीही तत्कालीन गद्य नाटककारांप्रमाणें इंग्रजांघरची उसनवारी न करितां किर्लोस्करांनीं जें “ सौभद्र ” लिहिलें त्यानेंच त्यांना नांव दिलें. या नाटकाचे पहिले दोन अंक कालिदासी असून पुढले तीन मोलियरी आहेत. पहिल्या दोन अंकांत अवास्तव रोमॅन्स आणि पुढील तीन अंकांत हांसता बागडता वास्तव विनोद ज्यांच्या नजरेला आला असेल, त्यांनाच हें विधान पटेल.

त्यानंतर किर्लोस्करांनीं रामराज्यवियोग हातीं घेतलें. सूत्रधारनटीप्रवेशांत रंगभूमीवर प्रेक्षकांसमोर नटीची मंथरा बनवून त्यांनीं सूत्रधारनटीसंप्रदायाला मूठमाती देण्यास सुरवात केली होती. या नाटकाची रचनाही शेक्सपीअर मोलियरमिश्रित आहे. त्यांच्या हातून पुढें नाटकें झालीं असतीं तर पुढील नाटकांत त्यांनीं सूत्रधारनटीला खात्रीनें अर्धचंद्र दिला असता किर्लोस्करांच्या सर्व नाटकांत प्रवेशांची फाजिल भरती नव्हती, हें ध्यानांत

ठेवण्यासारखें आहे, असें रामराज्यवियोगाच्या रचनेवरून वाटतें.

किर्लोस्करांची ही अपूर्त कल्पना जरी देवलांना पुरी करण्याचें धैर्य झालें नाहीं तरी तें श्रेय श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांनीं मिळविलें. त्यांच्या नाटकांनीं निव्वळ कालिदासी-शेक्सपीअरी संप्रदायाला पहिला धक्का दिला. पण मोलियरी संप्रदायाचा पुरस्कार करितांना शेक्सपीअर संप्रदाय विसरणें त्यांना तत्कालीन परिस्थितीमुळें अशक्य झालें. देवलांचें शारदा नाटक या संप्रदायांतील 'वीरतनय' या नाटकानंतरच अस्तित्वांत आलें. श्रीपादकृष्णांच्या संप्रदायांतील हें पहिलेंच नाटक होय.

तरीहि नाटकाची कालमर्यादा कमी करण्याचें कोणीच अंगीकारलें नाहीं. श्रीपाद कृष्णांच्या नाटकांतही पद्यांची संख्या शंभराहून कमी झाली नाहीं. आजच्याप्रमाणें गाण्याचें दळण घालण्याची त्यावेळीं पद्धत नसल्यामुळें हीं सर्व पद्यें गाइलीं जात असत व त्यामुळें प्रयोगाचा कालावधि वाढत असे, तरीही बराच मर्यादित होता. आज त्याच नाटकांचे प्रयोग करितांना प्रवेशांचे प्रवेश आणि पदांचीं पदें खच्ची केलीं जात असल्यामुळें तीं सुंदर नाटकें विरूप होऊन लुप्तप्राय होऊं लागलीं आहेत.

प्रयोगाची कालमर्यादा आंखूड करण्यासाठीं पहिल्यानें पदांची संख्या कमी करणें अवश्य होतें. म्हणून 'कुंजविहारी' नाटकांत ज्या वेळीं मी ही संख्या साठांजवळ आणून गद्यभाग वाढविला त्यावेळीं त्या नाटकांत काम करणाऱ्या नटांनीं माझ्यावर काहूर उठविलें. गद्यभाग पाठ करण्याचा अवजड बोजा त्या संगीत नटांना जरी दुःसह झाला तरी त्या नाटकाचे प्रोड्यूसर जनुभाऊ निमकर यांना पदांची संख्या कमी करण्याची माझी कल्पना आवडल्यामुळें तिचा यशस्वी प्रयोग करून पाहातां आला. त्यापुढें होणाऱ्या इतर नाटककारांच्या व माझ्या नाटकांतही ही पदांची संख्या पन्नासाच्या आंत बाहेर येऊन बसली. 'सत्तेचे गुलाम' नाटकांत ही संख्या पंचवीसांवर आणून ठेविली गेली, पण मोठ्या नाटकांत त्यापुढें ती याखालीं जाऊं शकली नाहीं. 'तुरुंगाच्या दारांत' या त्रुटित नाटकांत मात्र ती अकरांवर आणतां आली.

शेक्सपीअर संप्रदायानें मराठी रंगभूमी जरी काबीज केली होती तरी शेक्सपीअरच्या मायभूमींत तिकडे स्कँडिनेव्हिअन नाटककारांनीं मोर्चे लाविले होते. पण या गोष्टीची दाद महाराष्ट्राला लागली नाहीं. सुशिक्षित

आणि पदवीधर समाजाला देखील शेक्सपीअरखेरीज दुसरीं कुठलीं नाटकें इंग्रजी रंगभूमीवर होतात किंवा नाहीं या गोष्टीचा पत्ताही नव्हता. तिकडे शेक्सपीअर नामशेष झाला होता, तरी आम्ही त्याच्याच नांवानें इकडे ढोंगोरा पिटीत बसलों होतों.

हा सुशिक्षितांचा देखील दोष होता असें म्हणतां येणार नाहीं. युनिव्हर्सिटीच्या अभ्यासक्रमांत शेक्सपीअरखेरीज दुसऱ्या कोणाही नाटककाराला मज्जाव होता. ऑक्सफर्ड केंब्रीजहून येणारे प्रोफेसर तोंड फाटे-पर्यंत शेक्सपीअरची स्तुति करीत होते. त्यामुळें पाश्चिमात्य नाटककार— म्हणजे एकटा एक शेक्सपीअर, असा पदवीधर विद्वानांचाही गैरसमज झाल्यास नवल नाहीं.

इंग्रजी भाषेखेरीज दुसऱ्या कोणत्याही भाषेला अजून आमच्या युनिव्ह-र्सिटींत प्राधान्य दिलें जात नाहीं. इंग्रजी हीच आमची देवभाषा आणि इंग्रजींत प्रसिद्ध होणारीं पुस्तकें तेवढेच आमचे वाङ्मय-वेद. इंग्रज लेखका-खेरीज इतर युरोपीयन ग्रंथकारांचा नामनिर्देश करण्याची इंग्रजी ग्रंथ-कर्त्यांची फारशी संवय नसल्यामुळे इंग्रजी वाङ्मय म्हणजेच युरोपीयन वाङ्-मय असा आमचा समज करून दिला जात होता. टॉलस्टॉयसारखा एखादा इंग्रजेतर ग्रंथकार जरी आम्हां लोकांच्या हातीं पडला तरी त्याचें संपूर्ण वाङ्मय इंग्रजींतून मिळण्याची अजूनही मुष्किल आहे. स्पॅनिश, जर्मन, इटा-लियन, हंगेरीयन, स्कॅंडिनेव्हिअन, रशियन वगैरे ग्रंथकारांच्या वाङ्मयाचा अजून आम्हांला पत्तासुद्धां नाहीं. या ग्रंथकारांच्या वाङ्मय-भांडारावर हल्ला चढवून इंग्रजी ग्रंथकारांनीं जरी आपल्या वाङ्मयाला भरगच्च वैभव आणिलें आहे, तरी त्याचा फायदा आम्हांला मिळाला नाहीं—मिळूं दिला नाहीं.

इंग्रजी वाङ्मयांतच आम्ही मुरले गेलों. मोठ्यांचे आधार द्यायचे तरी मेकॉले, मिल, बर्क, स्पेन्सर, बेकन, यांच्यापलीकडे आमची धांव जाईना. आधुनिक इंग्रजी ग्रंथकारांचीं नांवे सुद्धा अजून आम्हांला माहित नाहींत.

इंग्रजी ग्रंथकाराचें कोणतेंही पुस्तक घेतलें तर त्यांत इंग्रजेतर ग्रंथका-रांची भरगच्च निंदा भरलेली. कादंबरीचीं काल्पनिक पात्रें पाहिलीं, तरी जर्मन म्हणजे बदमाष—गुप्तहेर, रशियन म्हणजे—पहिल्यानें निहिलिस्ट व

आतां बोल्शेव्हिस्ट, प्रत्येक फ्रेंचमन बदफैली जुवेबाज, अमेरिकन म्हणजे सट्टेबाज, असाच दिसून यावयाचा. इंग्रजी वाङ्मयाच्या अभ्यासानें अशा प्रकारें आम्हीं इंग्रजेतर युरोपियनांचा द्वेष करण्यास शिकलों. आणि त्याचमुळें ज्यांच्या वाङ्मयाचें चौर्य करून इंग्रजी ग्रंथकारांनीं आपलें वाङ्मय सुसंपन्न केलें, त्या वाङ्मयाशीं आम्ही मक्तीनें अपरिचित राहिलों. विचार इंग्रजींत, आचार इंग्रजींत, वाङ्मयरचना इंग्रजी धर्तीची पण ती देखील जुनी पुराणी, अशी आमची स्थिती झाली असल्यामुळें अवाढव्य जगांतल्या वाङ्मय-भांडाराद्वारे मराठी वाङ्मय सुसंपन्न करण्यास आम्ही असमर्थ झालों. या बौद्धिक पारतंत्र्यामुळें स्वतंत्र रीतीनें वाङ्मयरचना करणें, स्वतंत्र संप्रदाय निर्माण करणें, आम्हांला अशक्य होऊन बसलें. आज जें कांहीं वाङ्मय आहे तें इंग्रजी अमलांतलें आहे—स्वतंत्र हिंदुस्थानांतलें नाहीं. म्हणून कांहीं काल इंग्रजी वाङ्मयावर अजिबात बहिष्कार घालून स्वतंत्र रीतीनें—इंग्रजी वाङ्मयाची पूर्ण विस्मृति करून स्वतंत्र रीतीनें—वाङ्मय निर्माण केल्याखेरीज मराठी भाषेला केव्हांही अव्वल दर्जा येणें शक्य नाहीं. सामाजिक सुधारणेसाठीं प्रचलित रूढी आणि जुन्या परंपरा मोडणें जितकें आवश्यक आहे, तितकीच आवश्यकता वाङ्मयक्षेत्रांतील बौद्धिक गुलामगिरी झुगारून देण्यांतहि आहे, याची जाणीव आम्हांला केव्हां होणार ? तूर्त एवढेंच पुरे.

आज मराठी नाटकें कितीही बोजड असलीं तरी जुन्या संस्कृत नाटकांची पद्धती एकांकप्रवेशीच होती. त्या नाटकांत कांहीं अंकांच्या आरंभीं जरी एखादा लहानसा विष्कंभक असला तरी तो प्रवेशाच्या सदरांत घालतां येण्याजोगा नाहीं. एकाच नाटकांत भाराभर प्रवेश घालण्याची बोजड प्रथा शेक्सपीअरच्या अनुकरणानेंच हिंदी वाङ्मयांत शिरली. इंग्रजी रंगभूमीनें शेक्सपीअरचींसुद्धां नाटकें एकांकप्रवेशी केलीं, तरीही शेक्सपीअरचा हा अवजड विलायती मुडदा डोक्यावर वागविण्याची अजूनही आम्हांला खंत वाटत नाहीं. एकाच अंकांत जास्त प्रवेश घालण्यासाठीं वरून खालीं घसरत येणारा रस्ता किंवा खालून वर गुंडाळले जाणारें जंगल अगर महाल पहातांना वास्तवतेचा खून होत आहे, याची अजून आम्हांला जाणिव होत नाहीं. नाटकाची कालमर्यादा मर्यादित करण्याबरोबर या बोजड, अवास्तव आणि

अजागळ प्रकारालाहि फांटा दिला पाहिजे. इंग्रजी रंगभूमीवर ही सुधारणा होऊन गेली आहे पण अजून त्याचा आम्हांला पत्ता लागला नाहीं. नाटकें लहान करणें हें जसें एक ध्येय असलें पाहिजे, तशींच तीं एकांकप्रवेशी करणें पहिल्यानें अवश्य आहे, हें आधुनिक नाटककारांनीं विसरतां कामा नये.

या दोन्ही सुधारणांचा पहिला प्रयोग १९२३ च्या फेब्रुवारी महिन्याच्या पहिल्या तारखेस **ललितकलादर्श मंडळीनें 'तुरुंगाच्या दारांत'** या नाटकानें केला. पण त्याला आमची दुकानदारी बुद्धि आड आली. हिशो-बाच्या त्रैराशिकाचा मेळ जमेना. सहा तासांला जर आठ आणे तर तीन तासांला किती, असा हिशोब करीत बसणाऱ्यांनीही एकांकप्रवेशी नाटकास थोडाबहुत विरोध केला; तशीच परिस्थितीही आड आली.

प्रयोगदृष्ट्या हा प्रयत्न जरी यशस्वी झाला तरी आर्थिकदृष्ट्या परिस्थि-तीच्या प्रतिकूलतेनें त्यावेळीं या योजनेला दगा दिला. आणि त्यामुळें दोन अडीच हजार वर्षांपूर्वी भासानें वसविलेली—एकांकप्रवेशीच नव्हे तर—फक्त एक, दोन किंवा तीन अंकी नाटकांची ही जुनी असलेली—पण आजला नवी वाटणारी—पद्धति सरसहा अमलांत येणें आज कांहीं वर्षे दुरावलें, एवढें मात्र खरें

महाराष्ट्राच्या प्रतिकूल सांपत्तिक परिस्थितीमुळें कोणत्याही प्रकारचे नवीन प्रयोग करून पाहाणें धंदेवाईक नाटक मंडळ्यांना या मधल्या मुदतींत अशक्य होऊन बसलें होतें. धंदेवाईक नसलेल्या एखाद्या संस्थेकडून हे प्रयोग करून पहाण्याचें ज्यावेळीं माझ्या मनांत आलें त्याचवेळीं **सहकारी मनो-रंजन मंडळीचे** एक पुरस्कर्ते व ग्रंथकार गंगाराम बाबाजी कदम यांनी त्या कल्पनेला मूर्तस्वरूप देण्याचें कबूल केलें. त्याप्रमाणें सहस्रबुद्धे यांनीं भाषांतरित केलेल्या बर्नार्ड शॉच्या एका नाटकाची तालीम देखील जवळ जवळ सुरू झाली होती. शेक्सपिअरी संप्रदाय ज्याप्रमाणें त्याच्या नाटकाच्या भाषांतरानें सुरू झाला, त्याचप्रमाणें हा संप्रदाय इब्सेन संप्रदायांतील नाटक-कारांच्या नाटकांच्या भाषांतरांनी सुरू करण्याचा उपक्रम करण्याची ही कल्पना कदमांच्या मृत्यूमुळें दुर्दैवानें तशीच सोडून द्यावी लागली.

१९२९ सालच्या एप्रील महिन्यांत माझे मित्र दत्तात्रय गणेश सारोळकर

यांनी या कल्पनेस मूर्तस्वरूप देण्याचा भार अंगावर घेतला. त्यांच्याच प्रेरणेनें **श्री भारत नाट्य मंडळानें** एकांकप्रवेशी त्रुटित नाटकें रंगभूमीवर आणण्याचें ठरविलें. त्याच वर्षाच्या मे महिन्यांत आज प्रसिद्ध होत असलेलें ' पापी पुण्य ' हें नाटक लिहून तयार झालें आणि सारोळकरांच्या देखरेखीखालीं त्याच्या तालमीही सुरू झाल्या. स्वत: सारोळकर यांनीहि ' देवदासी ' नांवाचें असेंच एक नाटक लिहिण्यास घेतलें व हीं दोन्ही नाटकें रंगभूमीवर येण्याचें जाहीर करण्यांत आलें.

ही नवी पद्धति अमलांत येऊन सारोळकरांच्या मेहनतीचें चीज होणार, याचा मत्सर वाटणाऱ्या कांहीं गिरगांवांतील नाक्यावरील गांवगुंडांनीं श्रीभारत नाट्य मंडळाला प्रेमानें आर्थिक साहाय्य देणाऱ्या गृहस्थांचें मन कलुषित केल्यामुळें मंडळाची परिस्थिती असहाय झाली आणि हीं दोन्हीं नाटकें रंगभूमीवर आणण्याचें कांहीं काळ तहकुब करणें भाग पडलें.

याच वेळीं गुजराथी अमेच्युअर रंगभूमीवर कन्हय्यालाल मुनशी यांनीं लिहिलेल्या ' काकानी शशी ' या नाटकाचे प्रयोग सुरू झाले होते. मराठी नाहीं तर गुजराथी रंगभूमीवर तरी हें नाटक यावें, असें माझ्या गुजराथी मित्रांना वाटल्यावरून, व भाषांतरित केल्यास त्याचा प्रयोग करण्याचा भार पत्करण्याचें त्यांनीं कबूल केल्यावरून, मी या नाटकाचें गुजरातींत भाषांतर करण्याचें ठरविलें. मराठी व गुजराती या दोन्ही भाषा जाणणारा महाराष्ट्रीय मिळणें शक्यच नव्हतें. गुजराथी समाजांत हें काम करण्यालायक अशी माहितीची एकच व्यक्ति म्हणजे सुदामा पेपर मार्टचे मालक **मगनलाल जव्हेरी.** त्यांनींही तें काम आनंदानें पत्करिलें; पण तितक्यांत कायदेभंगाची चळवळ सुरू झाली—आणि प्रयोग करण्याची कबुली दिलेले माझे गुजराथी मित्र त्यांत सामील झाले. व्यवसायव्यापृतत्वामुळें मगनलालजी यांसही भाषांतर करण्यास सवड झाली नाहीं. तितक्या मुदतींत त्यांनीं तें नाटक नवीन कल्पनांचा प्रचार बनविण्यांत तरबेज असलेले माझे मित्र अनंत हरी गद्रे यांच्याकडून वाचून घेतलें व त्यांना तें फार आवडल्याचें मला कळविलें. ही गोष्ट पुन: एकवार प्रयत्न करण्यास उत्तेजन येण्यास कारणीभूत झाली.

तितक्यांतच भारत नाट्यमंडळाची सुव्यवस्था करण्याचें त्यांतीलच एक

दोन मेंबरांनीं झीज सोसून अंगावर घेतलें. पुन्हां नाटकाच्या तालमींना सुरवात झाली, नाटकाचा प्रयोग झाला, पण पुन्हां तीच अडचण आली. झीज सोसण्यासही कांहीं मर्यादा आहेच.

आधींच नाटक बसविणें व नेपथ्यरचनेची जुळवाजुळव करणें फार मुष्किलीचें. त्यांतून नाटक परंपरेला सोडून लिहिलेलें. अशा स्थितींत आगाऊ प्रसिद्धीकरणावरच सारा भार असल्यामुळें तो खर्च मुबलक रितीनें करण्याची मंडळांतील मेंबरांची ताकद नव्हती. असा खर्च करणारा पृष्ठपोषक मिळणें सर्वांच्याच नशिबीं नसतें. धंदेवाईक नाटकमंडळ्यांना देखील जें प्रसिद्धीकरणाचें काम डोईजड जातें, तें सारा दिवस पोटासाठीं खपून रात्रीच्या वेळीं नुसत्या कलेच्या अभिमानासाठीं बिनपगारी राबणाऱ्या मंडळाच्या मेंबरांना कसें साध्य व्हावें! म्हणूनच कांहीं प्रयोग होऊन पुन्हां मंडळाला स्वस्थ बसावें लागलें.

पुन्हां वेळ आली. मंडळाचे जुने मेंबर व या पुस्तकाचे प्रकाशक पुढें सरसावले आणि आज या नाटकाचा निदान प्रकाशनापुरता तरी अज्ञातवास संपला. 'नूतनकल्पनाविष्कृती'चा द्वेष दातीं धरून बसलेल्या गिरगांवांतील गांवगुंडांची मेहेरनजर जर पुन्हां श्री भारत नाट्यमंडळाकडे वळली नाहीं तर या नाटकाचा सर्वच अज्ञातवास संपेल, असें आज वाटत आहे.

भार्गवराम विठ्ठल वरेरकर.

# पापी--पुण्य

## पहिला अंक

[ मुंबईत भरवस्तींतील एका प्रशस्त ब्लॉकमधील एक दिवाणखाना चारी बाजूला गाद्या व तक्के आहेत. बाजूला तबला, सारंगी व तंबोरा पडला आहे. कोंपऱ्यांत एक कोच व एका बाजूला तीन चार गादीच्या खुर्च्या आहेत. आंत पेटीवर कुणी गझल वाजवीत आहे व त्याबरोबर तबल्याची साथ चालली आहे. एक बाल्या येऊन पानाचीं तबकें आणून ठेवतो, गाद्यांचे सुरकुतलेले अभ्रे चापून चोपून साफ करतो, सामान जरा व्यवस्थित लावून ठेवतो व जातो. माणिकराव येतो. ]

**माणिक :** केसर—ए केसर—( कुणी साद देत नाहीं. ) केसर—ठेव पाहूं ती पेटी गुंडाळून. आणि तूं रे चंद्या—आण तो तबला इकडे. ( तबला बंद होतो व चंद्या तबला आणून ठेवून माणिकरावाच्या तोंडाकडे पाहात राहतो. ) पाहातोस काय माझ्या तोंडाकडे ? हजार वेळां सांगितलं तुला कीं माझ्या हुकुमाशिवाय तबला वाजवीत जाऊं नकोस—( चंद्या बोलण्याचा प्रयत्न करतो. ) बोलूं नकोस. नुसता हुकूम बजाव. मला नकोत आहेत तुझ्या सबबी ऐकायला. म्हणणार काय तूं ? केसरनं हट्ट घेतला—हेंच कीं नाहीं ? जा, चल—केसर—केसर—निघ इथनं गाढवाच्या लेका. ( चंद्या जातो. ) केसर ती पेटी बंद करून आधीं इकडे ये पाहूं. काय माजुरी आहेत एकेक. ऑर्डर आहे कीं काय आहे ? केसर—( पेटी बंद होते व केसर येते. ) ऐकूं नाहीं येत ? किती वेळ कोकलावं तुझ्या नांवानं ?

**केसर :** आवाज बसेपर्यंत. ( वसकन् अंगावर येऊन ) असं ओरडतां कशाला ? काय आली आहे एवढी लगीनघाई ?

**माणिक :** लगीनघाई ? तुला काय ठाऊक लगीन अन् लगीनघाई ? गेली होतीस का कधीं मांडवाखालून ?

**केसर :** कांहीं तुमच्यावाणी अगदींच उपटसुंभ नाहीं बरं मी. चांगलं पहिलं लगीन झालं होतं—मागनं दोन म्होतुरं लावलीं. मेला नवराच जगेना त्याला मी तरी काय करूं ? आतां चाललींच आहेत की हीं रोजचीं लग्नं !

**माणिक :** होय ना ? मग कसली लगीनघाई म्हणून काय

विचारतेस ? रोज लग्नं चाललीं कीं रोज लगीनघाई असायचीच. ऐकलंस ? आज एक वाघ पकडला आहे. साधा चित्ता नव्हे— जातिवंत पट्ट्या वाघ आहे. जनावर जरा तेज आहे. फट्कन् केव्हां नरडं फोडील याचा नेम नाहीं. जरा चुचकारून घ्यावं लागेल आरंभाला. साताखेतांचं पाणी प्यायलेलं आहे बाळ, बरं का ? अगदीं नवतीचा नाजुक नर नव्हे. असलीं मुंबईतलीं शेकडा साठ घरं उजवून बाहेर पडला आहे—पण कुणालाच बधला नाहीं. लक्षाधीश आहे—पण संन्याशासारखा तीन रात्रींवर एका गांवीं वस्ती करीत नाहीं. अहमदखांबरोबर मी पैज लावली आहे तुझ्या जिवावर—

**केसर :** बरा माझा जीव मिळाला आहे तुम्हांला महालक्ष्मी करायला. काय पैज लावली आहे ?

**माणिक :** कीं आमची केसर त्याला एक महिन्याची सक्तमजुरी देईल म्हणून. बेटा काय म्हणतो मला, कीं त्या बन्नूजानला दोन दिवस आवरला नाहीं ! म्हणे बन्नूजान—अप्सराच कीं नाहीं इंद्राची ? असल्या कपाशीच्या गठ्ठयाला भाळायला डोळेच फुटले पाहिजेत कुणाचे. बरं का—त्याला दोन नाद आहेत. कुणाला ? त्याला. त्याला दोन नाद आहेत. एक खाण्याचा नि दुसरा गाण्याचा. पिण्याचा नाहीं म्हणतो पण आला इकडे म्हणजे पाहूं. खाण्याची व्यवस्था मी करतों— गाण्याचं तूं पहा. असा आदा करशील कीं बस्स् ! अग, गाणं थोडं असलं तरी चालतं पण नखरा पाहिजे. तेव्हां तें तुझं तूंच पहा. जा आतां आंत नि झटकन् पोषाख बदलून ये. वाहवा करणारी मंडळी आतां येईल—

**केसर :** अगबाई, तो मंकड्या येणार आहे कीं काय ? मेल्याला गाणं कशाशीं खावं तें सुद्धां कळत नाहीं. सभेची टाळी कुठं तरीच देतो नि मी मग बिचकून जातें.

**माणिक :** तसलींही वेडपीं पाहिजेत. अग हीं विनोदी पात्रं नसलीं तर मजलसीला रंग येत नाहीं. हे पहा आले— जा—जा आधीं पोषाख करायला. ( केसर जाते. ) आणि असं पहा. तो पेटींतला साज चढीव अंगावर. ( केसर आंतून— " हो हो—कळतं आहे मला. तुम्हीं नको सांगायला ! " )

[ कवि, एडिटर वगैरे मंडळी येतात. ]

**माणिक :** यावें—यावें—सभाजनहो, हीं आसनें आपल्या स्थानापन्नतेनें विभूषित करा.

**कवि :** ओहोहो—

( झपुझ्योच्या चालीवर )

**कष्टविण्याला प्रेमीजन् । आलि नभामधुनी चटकन् ॥**
**दर्शन व्हावें कवि वदला । बुरखा ओढी ती बाला ॥**
**इष्काच्या झंझावातें । कविचें हालेना पातें ॥**
**पायिं शृंखला ( म्हणजे सांखळ्या ) कटीं मेखला । खेळ चालला । पदिंचे नूपुर रुणझुणती ।**
**छुछुंछा-गडे छुछुंछा ॥ १ ॥**

**माणिक :** अहो कवि, या जागीं तुमचीं काव्यं आवरतीं घ्या. ह्या बिझिनेस कार्टर्स आहेत. इथं गिऱ्हाइकं येतात, त्यांच्या येण्यावर माझा भरिभार आहे. अशावेळीं तुमचीं काव्यं सुरू झालीं तर लोक भीति घेतील, इथं यायचे बंद होतील, अन् माझा व्यापार साफ बसेल.

**एडिटर :** खरं आहे. आम्हीं इथं येतों म्हणजे काय—

आपले यायचं म्हणून येतों. आमच्या येण्यानंच या स्थळाला महत्व येतं. आम्हीं येतों म्हणूनच ही जागा सभ्य मानली जाते आणि ही जागा सभ्य मानली जाते म्हणूनच आम्हीं येतों. आमच्या व्यवसायासाठीं आम्हीं इथं येतों—माणिकरावांच्या व्यवसायासाठीं आम्हीं इथं येत नाहीं, एवढं आपण ध्यानांत ठेवलं पाहिजे. तुम्हीं कवि म्हणजे—

**कवि :** आम्हीं कोण म्हणोनि काय पुससी आम्हीं असूं लाडके ! देवाचे—

**माणिक :** मग जा तर देवाकडे—इथं नाहीं तुम्हीं कुणाचे लाडके. इथं माझे महाजन माझे लाडके. माझ्या लाडक्या केसरच्या करामतीवर माझे महाजन माझा पाहुणचार स्वीकारतात. इथं देवाचं काम नाहीं—इथं जॉर्ज टॅब्लेट्सचा दवाखाना आहे. समजलं? अरे ए कवि, आज जरा फाजिलपणा आवरता घे. आजचे पाहुणे मोठे सैतान आहेत. खूप स्तुति कर केसरची—तुझ्या काव्याची परीक्षा आहे आज. ध्यानांत ठेव, सैतानासमोर देवाचं नांव घ्यायचं नाहीं.

**कवि :** त्याची नको काळजी—पण हें पहा, आज व्हिस्कीचा पेग—

**माणिक :** हं—तें नांव काढूं नको. तो खातो पण पीत नाहीं. दारूचा दुष्मन् आहे लेकाचा. आज उपास घडणार तुला—आज नुसतं आइस्क्रिमसोडावर भागवून घे—

**मंकय्या :** हें फार उत्तम झालं. तुम्हीं लोक दारू पिऊन घाण करतां साऱ्या मजलसीची. हें पहा माणिकराव, मी अशी गाण्याची तारीफ करतों, कीं देखते रहेना. पण उद्याची तजवीज

झाली पाहिजे. खाणावळवाल्यानं अडवून धरलं आहे. ब्राह्मणाला भोजनदक्षणा द्यायची राहिली बाजूला--लेकाचा वर पैसे मागतो !

**एडिटर :** कसे रे तुम्हीं दरिद्री ! रोज द्या--द्या--द्या --खेरीज भाषा नाहीं. माणिकराव, तुम्हीं माझ्याबद्दल काळजी करूं नका. उद्यांच्या अंकाचं लीडरच देतों आज वठवून ! असं वर्णन करतों केसरचं, कीं सीता-सावित्री काहींच नव्हेत तिच्यापुढं. पण हें पहा--तेवढीं कागदाचीं बिलं भागवा बुवा. इकडे आलों नि जाहिरातीचीं बिलं वसूल करायचीं राहिलीं.

**माणिक :** थांबा--तो आला वाटतं—ऐका—बाल्या—अरे ए बाल्या—( बाल्या येतो. ) पाहुणे यायचे आहेत आज —तो रोजचा थेरडा नव्हे बरं—हे लक्षाधीश आहेत, अगदीं नवीन आहेत या जाग्याला. काय समजलास ? हं—बरं का—! ( तो जातो. ) मोठा हुषार आहे पोर—कुणाशीं कसं वागावं हें नुसत्या खुणेनं समजतो.

**मंकय्या :** आपल्याच तालमींतला.

**एडिटर :** या आखाड्यांत उतरतो त्याला इथले पेंच चांगलेच कळले पाहिजेत. असा तालीममास्तर असल्यावर— ( हंसतो. )

**माणिक :** हं—चूप. आतां जरा सभ्य माणसांसारखे बसा. कुणालाही वाटावं, कीं शास्त्रीपंडितांची सभाच भरली आहे जशी. ( बाल्या, बाळासाहेब व भास्करराव प्रवेश करतात. कवि दचकतो व माणिकराव त्यांच्याशीं बोलत असतांना कवि व एडिटर पाठ फिरवून आपसांत कुजबुजतात. ) यावें—

यावें— आपल्या शुभागमनानं—

**भास्करराव :** हेच माणिकराव बरं !

**बाळा० :** हेच माणिकराव ? अं ?—कुठं बरं पाहिलं होतं मी तुम्हांला ?—परवां चौपाटीवर तुमचंच व्याख्यान झालं होतं नव्हे ? पोषाख बदलला तरी रूप कांहीं बदलत नाहीं.

**कवि :** ( एडिटरला ) कावळा आहे लेकाचा !—

**माणिक :** असं आहे—धंदा तो धंदा आणि देशसेवा ती देशसेवा. वकील नाहींत का व्याख्यानं देत ? व्यापारी नाहींत का राजकारणांत पडत ? डॉक्टर नाहींत का धर्मकारणांत पडत ? मग मीच काय केलं आहे ? हा माझा **पेशा** आहे आणि ती माझी **सेवा** आहे. ऑपरेशन करतांना डॉक्टर लोक जसा पांढरा झगा घालतात तसाच हा माझा धंदेवाईक वेश आहे. मी हिंदू आहें. आपण बरोबर ओळखलंत मला. या बसा—भास्करराव, त्यांना परिचय करून द्या या मंडळीचा. [ तो गादीवर बसूं लागतो व इकडे तिकडे पाहूं लागतांच पुन: उठतो. ]

**बाळा० :** अं: ? अरे हा कवडा कां इकडे ?

**कवि :** जेथें न जाई रवि—तेथें राही कवि. हें पहा बाळासाहेब, ही अशी गंमत आहे— कवीला कुठंच बंधन नाहीं. निरंकुशा: कवय: !

**बाळा० :** आणि हे एडिटर ? हे नारदाचे अवतार इकडे कां ?

**एडिटर :** तें असं आहे—आम्हांला सर्वत्र संचार करावाच लागतो. धंदाच तो आमचा. त्यांतून हे माणिकराव

आमचे सहकारी मित्र. ते आणि आम्ही हल्लींच्या चळवळींत खांद्याला खांदा भिडवून काम करीत आहोंत. तेव्हां जिथं ते असतील तिथं आम्हीं असायचेच. शिवाय आणखीन् एक कारण आहे.

**बाळा०** : असं ?—काय **आणखीन्** कारण आहे ?

**एडिटर** : या इथल्या केसरबाई—मोठ्या विदुषी आहेत. हिंदुधर्माभिमानी आहेत. कुलपरंपरेमुळं त्यांना जो पेशा पत्क-रावा लागला आहे तें त्यांच्या कर्मभोगाचेंच विचित्र चेष्टित आहे. असं जरी आहे, तरी धर्मावरील निःसीम प्रेमासाठीं त्या हल्लीं भगवद्गीतेचं अध्ययन करीत असतात—मीच त्यांना गीतेचा अर्थ समजावून सांगतों.

**कवि** : अरे हो—बरी आठवण झाली. बरं का बाळासाहेब, केसरबाईनीं एक नाटक लिहिलं आहे—त्यांतलीं पदं व्याकरण-शुद्ध करून देण्यासाठीं मी येत असतों.

**बाळा०** : असं ? काय रे ए कवड्या, मी असा मधुकरी-वृत्तीनं फिरतों म्हणजे अगदींच अक्कलशून्य आहें, असा का तुझा समज आहे ?

**माणिक**: नाहीं—कविराजांनीं सांगितलं तें खरं आहे. तें नाटक लवकरच रंगभूमीवर येईल, त्यावेळीं आपली खात्री पटेल. पण हा वाद कशाला उगीच ? केसर—केसर—तुझी तयारी झाली असली तर ये पाहूं अशी इकडे.

**कवि** : अगदीं सूत्रधार-नटीच्या संवादागत झालं म्ह-णायचं.

[ केसर येते व मुजरा करून लाजून तोंड फिरवून बाजूला

उभी राहाते. बाळासाहेब तिच्याजवळ जातो व तिच्या हनु-बटीखालीं हात लावून खस्कन् तिचा चेहरा वर उचलून पाहूं लागतो. ]

**केसर :** हें काय वरं हें असं ?

**बाळा० :** केसरबाई, मी कविही नाहीं किंवा मूर्खही नाहीं. चार बोलभांड वाष्कळांना बगलेंत मारून घटकाभर हैदोस घालण्यासाठीं जसा मी इथं आलों नाहीं, तसाच सौंदर्याची पुतळी देव्हाऱ्यांत वसवून कागदावर काव्य खरडीत बसण्या-इतका मी पागलही नाहीं.

**कपटलीला । शोभे**
**ती कुणा कवीला । हंसति**
**सकल परि न कळे ज्याला ॥ ध्रु० ॥**
**ऐशि कुटिल कविकरणी ।**
**आदरी न कोणी ।**
**उघड पडे मूढपणा ।**
**जरि संचरला ॥ १ ॥**

मीं कां आलों आहें हें माझं मला चांगलं माहित आहे. गिऱ्हाईक या नात्यानं मला माझा माल चांगला पारखून पाहिला पाहिजे. अशी वर पहा पाहूं.

**कवि :** हरहर ! काय हा रुक्षपणा ! केसरबाई, तुम्ही त्यांचं ऐकूं नका—

[ गझल ]

**विचाराचा विकाराचा । विलासाचा नि प्रेमाचा ॥**
**वसंताच्या विहाराचा । सुधांशु श्वेतकिरणांचा ॥**

**स्वरांच्या तार लहरींचा । नरांच्या कामबहरींचा ॥**
**करांच्या कंपस्फुरणाचा । वरांच्या प्रेममरणाचा ॥**
**पडूं दे माउली खालीं तुझ्या पायांतला पैंजण् ॥**
**वदूं दे फाटला कलिजा मुखानें प्रेम अन् भगवन् ॥**

हं नाच--केसरबाई--या रुक्ष नवरदेवाच्या कठोर कर-पल्लवाला प्रेमाचे अंकुर फोडण्यासाठीं तुझ्या गानपर्जन्याचा वर्षाव कर.

**माणिक :** या—बाळासाहेब, असे इथं बसा. जमलेल्या चार मंडळींची करमणूक **आधीं** झाली पाहिजे. ( तो बसतो. )

[ केसर नाचूं लागते, इतक्यांत दरवाजावर कुणी ठोठावतें. ]

**माणिक :** ( दचकून ) बाल्या, इकडे ये—( बाल्या येतो) केसर, थांब—बाल्या, बाहेर जा--खुणेची टिचकी वाजीव--बरोबर उत्तराची टिचकी आली तरच दार उघड !--म्हातारडा तर नाहीं ना आला ? त्याला आज केसर आजारी आहे म्हणून सांगितलं होतं—

**एडिटर :** नाहींतर तो सोशल प्यूरिटी लीगचा शर्मा असेल ! तो असला तर मला कुठं तरी लपलं पाहिजे. नुसता सैतान आहे बेटा. मला इथं पाहिलन् तर उद्यां साऱ्या वर्तमान-पत्रांतून माझी बदनामी करील. [ बाहेर दरवाजावर कुणी मोठमोठ्यानें ठोठावित आहे—एडिटर व कवि घाबरून इकडे तिकडे पळूं पाहातात. बाल्या येऊन माणिकरावाच्या कानांत कांहीं सांगतो. माणिकराव जातो-- ]

**बाळा० :** हं चालूं दे गाणं--अरे, असे घाबरतां कां ? ( माणिकराव येतो. )

**माणिक :** असं पहा बाळासाहेब, कुणी असलाच तसा तर हें तुमचंच घर म्हणून सांगा. तुमच्या नांवावर सारं काहीं खपून जाईल. म्हणावं, ही माझीच—

**बाळा० :** ही **माझी** कुणी नाहीं. मी खोटं बोलणार नाहीं. काय वाटलं हो तुम्हांला ? विलासाच्या चरितार्थासाठीं मी मधुकरीवृत्ति पत्करली म्हणून मी डोंगरीच्या तुरुंगांतून निढावून निघालेला कळकट बदमाष वाटलों तुम्हांला ?

**कवि :** अहो—होय म्हणा—होय म्हणा ! प्रकरण पोलिसांत गेलं तर माणिकरावांना स्वत:चं नांव सांगतां यायचं नाहीं. बाहेर त्यांचा दर्जा फार मोठा आहे—

**बाळा० :** आणि मला दर्जा नाहीं. सत्तावन उंबरठे झिजवले म्हणून मी हलकट आणि असल्या या नरकाच्या उंबरठ्याची इनामदारी पत्करलेला हा माणिकराव मोठा दर्जावाला ! रात्रीची भटकंती पत्करली म्हणून एका दमांत दणकावून खोटं बोलण्याइतका मी अप्रामाणिक बनलों नाहीं. (पुन: दरवाजावर धक्के बसतात.)

**केसर :** ( त्याच्या गळ्यांत हात टाकून ) ही पहा, मी तुमची झालें. आतां तसं म्हणायला काय हरकत आहे—होय म्हणायचं गडे—म्हणायचं ना ?

**बाळा० :** तूं **माझी** झाली असशील पण मी अझून काहीं **तुझा** झालों नाहीं. प्राण गेला तरी मी खोटं बोलणार नाहीं.

**माणिक :** काय हट्टी माणूस आहे ! ( दरवाजावर धक्के ) छे: आतां उघडलंच पाहिजे—

**कवि—एडिटर :** आधीं आम्हांला कुठं तरी लपवा.

**माणिक :** मरा लेको सारेच माझ्यावरोबर. जा बाल्या, दार उघड. [ बाल्या जातो. सर्व चित्रासारखे स्तब्ध बसतात—थोड्या वेळानें बाल्या व एक विधवा मुलगी प्रवेश करितात. तिला पहातांच सर्वांना हायसें वाटतें. घाबरटपणा टाकून दिमाखानें माणिकराव पुढें सरसावतो.]

**माणिक :** कोण ग तूं पोरी ? नाव काय तुझं ?

**हरणी :** माझं नांव हरणी.

**माणिक :** पण तूं कोण ?

**हरणी :** तुमच्या दाराशीं यायला पात्र झालेली एक अनाथ—अपंग—निराधार—स्त्री.

**माणिक :** मी कोण आहें तें तुला माहित आहे ?

**हरणी :** चुकून आलें नाहीं इथं मी--चांगला पत्ता काढून घेऊन आलें.

**बाळा० :** कुठून आलीस तूं ?

**हरणी :** कोण हो तुम्ही ?

**बाळा० :** माणिकरावांचा एक अशील.

**हरणी :** सांगूं का मी कुठून आलें ती ? तयारी आहे का ऐकायची ?

**बाळा० :** म्हणजे ?

**हरणी :** पंढरपुराहून आलें मी. वारकरी नाहीं मी—ती माझी पहिलीच वारी ! पांडुरंगाच्या राउळींची नव्हे—त्या—त्या—पलिकडल्या कसाईखान्याची !

**माणिक :** तिथंच राहिलं वाटतं पोर ?

**हरणी :** नाहीं--मेलं—( जमलेल्या मंडळींतील कुणी

म्हणतो, 'मारलं.' )--मारलं नाहीं—मेलं आपाप !

**पंडितर :** काय बेरड आहे ही पोर !

**हरणी :** कां हो ? काय झाला यांत बेरडपणा ? झालं तें सांगितलं.

**बाळा० :** मग घरीं कां नाहीं गेलीस फिरून !

**हरणी :** घर ? घर म्हणे घर ! पंढरपुराहून परत फिरलेल्या विधवेला कधीं घर असतं का ?

**माणिक :** पाळी कां आणलीस पंढरपूरला जायची ?

**हरणी :** **तुमच्या** कल्याणासाठीं ! पुरुषच विचारतो आहे का हें मला ?

**माणिक :** मग त्यालाच कां नाहीं धरून राहिलीस ?

**हरणी :** गळेकापूंना दया असते का ? तो मोठा सत्वस्थ ब्राह्मण आहे—गांवांत लौकिकवान आहे—परत आल्यावर त्यानंच मला गांवाबाहेर घालवून लावलं. **बायकांचं पाप चव्हाट्यावर येतं, पुरुषाच्या पापाला पुरावा नाहीं.**

**पुरुषाला कोण पुसे अधमाला ।**
**जरि नारकि पापी झाला ॥ ध्रु० ॥**
**कुणि संसारीं गरिब बिचारी ।**
**अडली चुकली फसली नारी ।**
**पापि गणुनियां जनता मारी ।**
**राजा नर त्यांचा झाला ॥ १ ॥**

**बाळा० :** मग इथं कां आलीस ?

**हरणी :** माझ्यासारख्या इतर चार बायका इथं येतात, त्याच कारणामुळं. जगलं पाहिजे ना ? या टीचभर खाईला पिंढ

दिला पाहिजे ना ?

**बाळा०** : मग कुठं नोकरी कां धरली नाहींस ?

**हरणी** : कसली **नोकरी** ? आईबापांनीं शिकवलं नाहीं, आतां नोकरी म्हणजे **पोळपाटलाटण्याची** जहागिरी, ती कशी मिळणार ? पंढरपुराहून **परतलेल्या** बाईच्या हातचं कोण खाणार ?

**बाळा०** : पण तूं **पंढरपुराहून परतलीस** हें लोकांना कसं कळतं ?

**हरणी** : मी सांगतें. केव्हांतरी कळायचंच मग खोटं कशाला बोलूं ?

**माणिक** : काय मूर्ख आहे पोरटी !

**बाळा०** : आहे खरी **मूर्ख**. एकुण तुला एकदम बेमालूम खोटं बोलतां येत नाहीं ?

**हरणी** : नाहीं येत अजून. यांच्यासारख्या महात्म्यांच्या सहवासांत हळुहळु येऊं लागेल.

**बाळा०** : कसं माणिकराव, अगदीं बिनडाक सोनं दिसतं !

**माणिक** : एकंदरींत **जात** अगदींच निराळी आहे. आमच्याकडे रोज येतात त्यांतली नाहीं दिसत. असल्यांच्या हातून नाहीं व्हायचा धंदा.

**बाळा०** : खरंच—**असल्यांचा** हातून धंदा व्हायचा नाहीं. चल ग हरणी, माझ्या **घरीं** चल.

**हरणी** : तुमचाहि **हाच** धंदा आहे वाटतं ?

**बाळा०** : नाहीं, मी यांचं गिऱ्हाइक आहें. आहें कसला ? होतों—आतां नाहीं.

**केसर :** (पुढें येऊन त्याच्या गळ्यांत हात टाकून) म्हणजे ? मला अशीच टाकून जाणार कीं काय ?

**बाळा० :** केव्हां तुला मी पत्करली तो आतां टाकणार आहें ?

**केसर :** नाहीं गडे—प्राण गेला तरी मी आतां जाऊं द्यायची नाहीं—

**बाळा० :** कसं काय हरणी, या नकला साधतील का तुला ?

**माणिक :** असं उगीच कां घाबरवतां तिला ? पोर भोळी आहे विचारी—

**बाळा० :** म्हणूनच इथं आली.

**हरणी :** आणि तुम्हीं कां इथं आलांत ? **तुम्हींही** भोळे आहांत वाटतं ?

**बाळा० :** मोठा बिकट प्रश्न आहे ! मी स्वतःला मोठा शहाणा समजत होतों, पण यांच्या दृष्टीनं मी नंदीबैल आहें. आज हा नवा प्रश्न उत्पन्न झाला--मी भोळा आहें का ?

**माणिक :** छे: छे: ! तुम्हांला कोण भोळा म्हणेल--आपल्यासारखे विद्वान--श्रीमान--

**बाळा० :** बस--बस—श्रीमान—वस्स—इथंच थांबा. श्रीमान माणूस भोळा नसतो—विद्वान ? आम्हीं मोठेच विद्वान आहोंत यांत शंका नाहीं. ( दार वाजतें. )

**कवि :** आतां मात्र खास पोलीस !

**एडिटर :** नाहीं तर शर्मा—अरे बापरे ! [दार मोठ्यानें वाजतें—सर्व स्तब्ध होतात. माणिकराव जाऊन दार उघडतो

व बाबासाहेब येतात.]

**बाळा॰ :** Oh—Oh—glad to meet you *here*, my dear papa—

**बाबा॰ :** तूं ?—इथं !—कारट्या, शरम नाहीं वाटत ? माहित नाहीं तुला ? ( केसरकडे बोट दाखवितो. )

**बाळा॰ :** (केसरला साष्टांग नमस्कार घालतो.) नमस्कार आईसाहेब, बालकावर रोष नसावा.

**माणिक :** बाळासाहेब—बाळासाहेब—काय हें ?

**बाळा॰ :** ही मातृभक्ति ! बाबा, येतों मी. चल ग हरणी—चल—

**हरणी :** कुठं ?

**बाळा॰ :** इथल्याखेरीज दुसऱ्या वाटेल तिथं--चल--चल-

[ तिचा हात धरून ओढून नेतो. ]

**बाबा॰ :** कोण ही मुलगी ? कुठं गांठली या बाळ्यानं ?

[ सर्व टकमक एकमेकांकडे पाहातात. ]

**बाबा॰ :** अरे, दांतखिळ का बसली ?

[ सर्व पुन्हां क्षणभर तसेच पाहात राहातात. केसर बाबासाहेबांचा हात धरून त्यांना गादीवर बसविते. सर्व मोठमोठ्यानें हांसूं लागतात. ]

[ पडदा पडतो. ]

# दुसरा अंक

[ बाबासाहेबांच्या घराचा आंतील दिवाणखाना रिकामा असतांना पडदा उघडतो. थोड्या वेळांत बाळासाहेब हरणीला घेऊन प्रवेश करतो. दिवाणखान्यांतील वैभव पाहून हरणी चकित होऊन थबकते. बाळासाहेब तिला खस्‌कन ओढून पुढें आणतो. ]

**बाळा० :** काय पहाते आहेस ? कधीं नाटकाला गेली नव्ह-तीस वाटतं ? असलं हें बेगडी वैभव—ह। खोटा चकचकाट—नाटकांतल्यासारखाच आम्हां श्रीमंताच्या घरींही पहायला मिळतो. फरक एवढाच, कीं तो पाहायला तिथं **पाहणाराला** पैसे द्यावे लागतात, इथं **दाखवणाराला** पैसे द्यावे लागतात.

**हरणी :** हें तुमचंच का घर ?

**बाळा० :** कुणाला ठाऊक कुणाचं तें ? कांहीं दिवसांपूर्वी, बाबा म्हणत होते—आमचे बाबा बरं का !—मघाशी त्या—त्या तिथं होते ते—ते म्हणत होते, हें **आपलं** घर म्हणून; हल्लीं मी म्हणतों **आमचं** घर म्हणून; कुणाला ठाऊक उद्यां एकादा मारवाडी हें आपलंच घर म्हणूं लागेल.

**हरणी :** घरांत कुणी बायकामाणसं नाहींत का इथं ?

**बाळा० :** नसतीं तर फार बरं झालं असतं. पण इथं सदोदितच कुणी बायका असत नाहींत. मात्र हल्लीं एक आहे. माझी आई नव्हे—माझी बहीण. माहेरीं आली आहे. अगदीं जुन्या काळची आहे. ती मोठी सच्छील आहे म्हणून लोक तिची वाखाणणी करतात. सर्व लोक मला जशा शिव्या देतात, तशी तिची तारीफ करतात. आतां दिसेलच ती.

**हरणी :** तुम्हांला शिव्या देतात ? कोण देतात ? कां देतात ?

**बाळा० :** या प्रश्नांचीं उत्तरें देतां यायचीं नाहींत. मोठे बिकट प्रश्न आहेत हे. पण लोक शिव्या देतात, एवढं मात्र खरं. आणि त्याचं प्रत्यंतर तुला इथं घरांतसुद्धां पाहायला मिळेल. या घरचा मालक मी आहें, पण मला इथं कुणी कवडीचीसुद्धां किंमत देत नाहीं. नोकरसुद्धां माझी पर्वा करीत नाहींत. आतांच पहा—मी इथं येऊन एवढा वेळ झाला पण कुणी **नोकरानंही** माझी विचारपूस केली नाहीं.

**हरणी :** मला राहून राहून तेंच आश्चर्य वाटत होतं. म्हटलं, एवढं मोठं घर, पण कुठं कुणी चिटपाखरूंसुद्धां दिसत

नाहीं. मी विचारणारच होतें—

**बाळा०** : थांब—अक्का—अग अक्का—अहो अक्कासाहेब—कोण आहे रे तिथं ?—अक्का आहे का घरांत ?

**वत्सला** : ( प्रवेश करून ) कोण ? बाळासाहेब ? हें काय बरं हें ? चांगली माणसासारखी नाहीं का हाक मारतां येत ? आपलं घर डोक्यावर घेतल्यासारखं ओरडायचं, हें शोभतं का तुला ?—आं ! ही कोण ?

**बाळा०** : कोण असावी असं वाटतं तुला ?

**वत्सला** : ( हरणीला नखशिखान्त निरखून पाहून ) तशी काहीं गृहस्थांतली दिसत नाहीं. बाळासाहेब—

**बाळा०** : हं—बोला—अक्कासाहेब, थांबलांत कां ? बोला.

**वत्सला** : काय बोलायचं ? बाळासाहेब, शेवटीं तुझी मजल इथवर गेली ना ? आजपर्यंत सारं काहीं घराबाहेर चालत असल्याचं ऐकत होतें; पण माझ्या डोळ्याचं पारणं फेडायला या वेसवेला घरीं घेऊन यायला तुला कांहींच कसं वाटलं नाहीं ?

**बाळा०** : मला चोरून लपून काहींच करायचं नाहीं. आजपावेतों कुणाला घरीं घेऊन आलों नाहीं हा कांहीं माझा दोष नव्हे. त्या कुणी घरीं यायला तयारच नसत—घरीं येण्या-जोग्या नव्हत्याच त्या मुळीं ! पण ही—हीं कशी आहे मला अजून माहित नाहीं—ही आली—घरीं ये म्हणतांच आली. मलाही थोडं आश्चर्य वाटलं.—तुला येते का हिची कांहीं दया ?

**वत्सला** : दया ? हिची दया ? बाळासाहेब, मला तुझी मात्र दया येते. बाळासाहेब, काय हें ? घरीं आई नाहीं—

गेली बिचारी—तिचं सोनं झालं—तुझे हे असले चाळे पाहायला जगली नाहीं, ती खरीच पुण्यवान. पण मला याचवेळीं कुठं माहेरीं येण्याची बुद्धि झाली !

**हरणी :** बाईसाहेब, माझी कहाणी फार वाईट आहे—

**वत्सला :** दिसतेच आहे ! काय नाटक रचून आणलं आहेस ?

**हरणी :** नाटक नाहीं—ढोंग नाहीं—मी जन्मांत कधीं कुठंही खोटं बोललें नाहीं. आणि खोटं बोललें नाहीं म्हणूनच माझ्या जिवाचे असे धिंडवडे झाले.

**अघपंकयुता किति वरनारी ॥ धृ० ॥**
**कुटिल जगाला त्रासुनि विटल्या ।**
**भवभयशंका सोडुनि हटल्या ।**
**परत घराला येण्या झटल्या ।**
**मातेविण त्यां कुणि तारी ? ॥ १ ॥**

**वत्सला :** कांहीं म्हटलंस तरी तूं कांहीं असल्या **गृह-स्थांच्या** घरांत यायच्या लायकीची दिसत नाहींस.

**बाळा० :** गृहस्थाचं घर ? अक्का, हें घर **गृहस्थाचं** आहे का ? या घरांतले पुरुष **गृह-स्थ** आहेत, कीं **भटके** आहेत ?

**वत्सला :** बाळासाहेब, **पुरुषांची गोष्ट वेगळी आहे.** बायकांचं तसं नाहीं—बायका म्हणजे झाडावरचीं फुलं—झाडावर आहेत तोंपर्यंतच त्यांची शोभा. तोडून फेंकलीं कीं कोमेजून जायचीं—

**हरणी :** खरं आहे बाईसाहेब; पण तोडलेलीं फुलंच देवाच्या पायावर वाहातात. देवाच्या पायावरचीं कोमेजलेलीं

फुलं देवाचा प्रसाद म्हणून मस्तकीं धारण करतात.

**वत्सला :** पण बाई, तीं फुलं **देवाच्या पायांवर** कोमेजावीं लागतात—गटाराच्या घाणींत नव्हे.

**हरणी :** पश्चात्तापाच्या सुस्कार्‍यांत देवाचे पाय समोर दिसतात. बाईसाहेब, मी अजाण होतें—अपंग होतें—दुसर्‍याचं सुख पाहून माझा जीव सुखाला लालचावला. सुख म्हणून जें कांहीं त्यावेळीं वाटत होतं तें माझ्यापुढं चालून आलं. आयुष्यभर देवाच्या नांवानं टाहो फोडीत होतें, पण त्याच घटकेला **त्याच क्षणाला** देवाची विस्मृति पडली. सुख म्हणून वाटलं होतं त्याचा स्वीकार केला, पण जगाच्या नजरेला तें पाप ठरलं—

**बाळा० :** थांबलीस कां ? बोल पुढं. अक्का, ती काय म्हणते आहे त्याच्याकडे तुझं लक्ष आहे ना ?

**हरणी :** ज्या चांडाळानं मला फसवलं, तो माझा दीरच होता. उघडकीला येऊं पहाणारं पाप लपवण्यासाठीं आणखी दुसरं मोठं पाप करण्याची त्यानं मला सल्ला दिली. एका पापाची जाणीव झाल्यामुळं दुसरं पाप करण्याचं धैर्य मला होईना. माझ्या अंतरांतला देव जागा झाला होता—त्यानं पापाचं भेसूर रूप मला दाखवून दिलं. मी ते **दुसरं पाप** केलं नाहीं. पंढरपूरला गेलें—तिथून ही परत आलें—

**वत्सला :** पंढरपूरहून आलेली ?—**पंढरपूरहून** आलेली ? चांडाळणी, गृहस्थाच्या घराचा उंबरठा विटाळायची तुला लाज कशी वाटत नाहीं ?

**हरणी**—मी **गृहस्थाच्या** घरीं आलें नव्हतें. गृहस्थ मला

थारा देणार नाहींत, याचा अनुभव मी एकदां सोडून हजारदां घेतला आहे. हे भटके वाटले—गृहस्थ नसावे, अशा समजुतीनें आलें. आलें कसलीं ? यांनीं मला ओढून आणलं. कां आणलंत ? सांगा पाहूं—माझी अशी विटंबना करण्यासाठीं का मला आणलंत ?

**बाळा०** : आतां आणखी काय विटंबना व्हायची राहिली आहे तुझी ?

**हरणी** : तेंही खरंच. पण परक्याच्या घरांत—

**वत्सला** : परक्या—गृहस्थांच्या घरांत तुझ्यासारखी वेसवा—

**बाळा** : हं—अक्कासाहेब, शब्द वापरतांना जरा आवरतं घ्या. कुणी कुणाला कसलं विशेषण द्यायचं तें देतांना, आपल्या पायाखालीं काय जळतं आहे, याचा आधीं विचार करावा लागतो.

**वत्सला** :—कसला रे विचार करायचा ? काय जळतं आहे आमच्या पायाखालीं ?

**बाळा०** : काय जळतं **आहे** ? काय जळत **नाहीं** अक्कासाहेब ? पहा—जरा स्वतःच्या आजूबाजूला पहा ! आपल्या जन्मदात्या पित्याच्या शीलाकडे पहा ! आपल्या पाठीला पाठ लावून आलेल्या भावाच्या वर्तनाकडे पहा आणि मग दुसऱ्यांना नांवं ठेवा.

**वत्सला** : पुरुषांची गोष्ट निराळी आहे. **पुरुषांना दोष नाहीं.** बायकांची गत म्हणजे मातीच्या भांड्यासारखी—एकदां खरकटं झालं, कीं फोडूनच टाकलं पाहिजे.

**हरणी :** हें कुणी ठरवलं? पुरुषांनींच ना? नीतीचा हा नियम ठरवतांना बायकांचं मत कधीं कुणी घेतलं होतं का?

**वत्सला :** कसलं घ्यायचं बायकांचं मत? बायको म्हणजे—

**बाळा॰ :** पुरुषाच्या पायींचं पायतण! तुडवतील तसं तुडवून घ्यायचं. कुरकुर केली, तक्रार केली, तर ती पायतळींच राहाते. कुरकुरणारी वहाण म्हणजे पुरुषांच्या पायींचा पैंजणच आहे. कुरकुर ही चालायचीच पण तुडवणारा पाय मजबूत असला, कीं कुरकुरीलाही सौंदर्य येतं.

**पति चरणतलिं सहज विदारितां।**
**शंकित वंचित न होय वनिता॥ धृ॰॥**
**जो पदिं हाणित तो प्रभु मानित।**
**कढे, रडे, वदे न दयिता॥ १॥**

**हरणी :** हक्कासाठीं नाहीं—नीति-अनीतीसाठीं नाहीं, पण बाई, दुसऱ्याच्या जुलमाला बळी पडलेल्या, पश्चात्तापानं पोळलेल्या, पण नवा डाव नवा पाव करायची इच्छा धरलेल्या एका गरीब जीवाला नवा जन्म द्यायचं भाग्य पदरीं घ्या.

**वितरागपरा अति दीन जनीं**
**लवमात्र दया येई न कशी॥**
**जें शासन हो अपराधयुता**
**तें लावितसां कैसें मजशीं॥**
**निज-देश-घरा चुकलें मुकलें**
**घर एक दुजें अपुलें गमलें॥**

कठिणें पुरुषं जरि आदरिलें
मृदु नारीपदें परि ताडियलें ॥
स्त्रीजात हरील खरी विपदा
म्हणुनि धरिला मृदु हात यदा ॥
प्रतिघात मिळे शिरिं लाथ बसे
करिं नारीपदा प्रणिपात सदा ॥

**वत्सला :** असल्या मेल्या वेस्वांची जीभच मोठी लुब्री असते. कशी चुरुचुरु बोलते आहे वसंतांतल्या कोकिळेसारखी! अशीच मेलीनं भुरळ पाडली वाटतं कुणावर! पश्चात्ताप म्हणे पश्चात्ताप! काय ग, तुला पश्चात्ताप झाला आहे ना? मग हें छापलेलं पातळ कशाला ग तुला? हे केंस फिरवून बुचडा कशाला बांधलास? हा वांकडा भांग कशाला ग? आणि ही फुलांची वेणी कशाला हवी वरती? असले नखरे करायचे पुरुषांना भुलवण्यासाठीं--

**हरणी :** अन् हेच नखरे तुम्ही केले आहेत, ते कुणाला भुलवण्यासाठीं?

**वत्सला :** **मला** विचारते?—**उलटून** विचारते?—अग टवळे, माझे नखरे पाहायला माझे पतिराज आहेत ना?

**हरणी :** आणि माझे नाहींत, हा कांहीं माझा अपराध नव्हे.

**बाळा० :** पण आज **इथं** कुठं आहेत तुझे पतिराज? पतिराजांसमोर असशील तेव्हां वाटेल तेवढा नट्टापट्टा कर. पण माहेरीं कशाला हीं थेरं? माहेरीं असलं—पतिराज परदेशीं असले, म्हणजे सच्छील तरुणींनीं बावन्या मोकळ्या सोडाव्या,

अंगावर लक्तरं धारण करावीं, वाढलेल्या वेलींचीं आभरणं धारण करावीं आणि जुन्या संस्कृत नाटकांतल्या विरहिणींप्रमाणं सुस्कारे सोडीत तिनं रानोमाळ हिंडत राहावं--

**हरणी :** तोंपर्यंत तिचे विरही पतिराज बहुधा माणिक-रावांच्या घरीं केशरकस्तुरीच्या खाईत लोळत पडलेले असायचे.

**बाळा॰ :** काय ग, विरहिणी, आतां बोलत कां नाहींस ? सुस्कारे कसले सोडते आहेस ? माझ्या रागाचे की पतिराजांच्या अनुरागाचे ? बोल ना—विरहिणी, भगिनी, बोल ना !

**कवि :** ( प्रवेश करून ) ओ-हो--विरहिणी ? कुठं आहे विरहिणी ?

पद--( भूपति खरे ते )

**गुंगला कवि जैं प्रतिभेच्या चरसांत ।**
**रंगली विरहिणी विहिरीवरि परसांत ॥ धृ ॥**
**सोडिते प्रियाच्या विरहानें निश्वास ।**
**अबघडी जाळिते उच्छ्वासें विश्वास ।**
**फुलवंतीचा नव राणा । तत्पती ।**
**रसवंतीचा रस-घाणा । तत्पती ।**
**नव नवतीचा लव बाणा । तत्पती ।**
**भेटला तियेला; दावा मजला दोन्ही ।**
**' मग खुशाल तिरडी बांधा माझी कोणी ' ॥ १ ॥**

**वत्सला :** मेल्या, कशाला आलास या वेळी इथं ? जातोस कीं नाहीं ? नाहींतर भय्याला बोलावून इथंच तुझी तिरडी बांधतें !

**बाळा॰ :** अरे कवड्या, जरा बाजूला हो. या आमच्या

घरच्या भानगडींत मधें तुझं कवितेचं विटाळं नको पडायला

**माणिकराव** : ( प्रवेश करून ) दूर हो कवि, इथं तुझं काहीं काम नाहीं. हें धार्मिक कार्य आहे. हें धर्मकार्य माझ्या अनाथगृहांतून या शुभगृहांत सनाथ होण्यासाठीं आलं आहे. या वेळीं—

**वत्सला** : मेल्या, हलकटा, अशा भलत्यावेळीं गृहस्थांच्या घरांत प्रवेश करायला तुला शरम कशी नाहीं वाटत ?

**माणिक०** : वत्सलाबाई, रागावूं नका. मी एक अव्यय, गुणातीत, निवृत्तकाम, परोपकारी—

**कवि** : परोपजीवी—

**माणिक०** : गप्प रहा—परोपकारी—निर्गुण—सनातन विभूति आहें, मी आहें म्हणून हें जग चाललं आहे--

**वत्सला** : जसं थांबलंच असतं जग तुझ्यावांचून ! मेल्या, गरीब गृहिणींचे गळे कापणाऱ्या कसाबा, मी तुला ओळखत का नाहीं ?

**माणिक०** : माझीं व्याख्यानं ऐकलीं असशील ?

**वत्सला** : व्याख्यानं म्हणे—आणि तो तुझा कारखाना–गरीब बिचाऱ्या विवाहित बायकांचे पति अडकावून ठेवण्याचा तुझा कसाईखाना !--

**बाळा०** : कसाईखाना कशाला म्हणतेस ? खरं नांव घे की ! ( हंसत हंसत जाऊन एका कोचावर बसतो. )

**वत्सला** : तें तूंच घे. चांगला माहित आहे तो तुला—

**माणिक०** : आणि तुझ्या बाबासाहेबांनाही.

**वत्सला** : मेल्या—चांडाळा—हलकटा—माझ्या बाबांचं

नांव घेतोस? माझ्या बाबांचं?— **माझ्या बाबांचं** ?—अरे, कुणी तरी या मेल्याला माझ्या डोळ्यांसमोरनं खेंचून काढा.

**माणिक॰ :** मी हलकट? काय हा वेडेपणा!

**कवि :** खरंच काय हा वेडेपणा!—

**नित्य जो बांधितो गांठी। नव्या दंपति रोजच्या।**
**अन् तया विधिची वारी। साक्षात् तो ब्रह्मदेव कीं!॥**

**माणिक॰ :** मी हलकट अं? वत्सलाबाई, तुमचं लग्न झालं त्या वेळीं तुमचा पति **तुमच्या** परिचयाचा होता का?

**वत्सला :** नाहीं.

**माणिक॰ :** **तुम्हीं** त्याच्या परिचयाच्या होतां का? (वत्सला खुणेनं नाहीं म्हणते.) मग झालं तर?

**वत्सला :** काय झालं?

**माणिक॰ :** तुमचं लग्न झालं. कुठूनसा एक उपाध्या आला, त्यानं एका अनोळखी पुरुषाला एका अनोळखी स्त्रीच्या शेजारीं बसवलं—तोंडानं कांहीं पुटपुटला—अक्षता टाकल्या—वाद्यं वाजवलीं—**दक्षणा घेतली.** झालं. दोन अनोळखी माणसांच्या जन्माच्या गांठी बसल्या. मीही तेंच करतों. दोन अनोळखी माणसं एका जागीं आणून त्यांच्या जन्माच्या नव्हेत—नुसत्या एका रात्रीपुरत्या—गांठी घालून देतों. **तशीच दक्षणा घेतों.** जन्माच्या गांठी बांधण्याइतका निर्दयपणा करीत नाहीं. दोघांचं पटलं नाहीं—एकानं एकावर जुलुम केला तरी दुसऱ्या दुबळ्यानं तो स्वस्थ मुकाट्यानं सहन करीत राहावं, आणि त्या जबर-दस्तानं मात्र वाटेल तसं वागावं, असली ब्रह्मगांठ मारणारा

**उपाध्या झाला धर्ममार्तंड** आणि एका रात्रींत सुटणारी निसरगांठ शिलगावणारा **मी मात्र हलकट** ? वत्सलाबाई, हा कुठला न्याय ?

**वत्सला** : शिव शिव ! ऐकवत सुद्धां नाहीं.

**कवि** : पण खरं आहे ना हे ? ही हरणीच पहा. तुम्ही सर्व गृहस्थांनीं हुचकावून लावली तेव्हां आश्रयासाठीं कुठं धांवली ?

**हरणी** : ऐकलंत ना बाईसाहेब ? सुखासमाधानानं मी यांच्या दारीं गेलें नाहीं.

**माणिक०** : हरणी, तूं माझं ऐक, या कुलीन गृहस्थांच्या नादीं लागूं नकोस. ही जागा तुझ्यासाठीं नव्हे. कुलीनांचीं कुलीन पापं सभ्यपणाच्या जरतारी पांघरुणाखालीं झांकलीं जातात, पण चुकून घडलेलं गरीबाघरचं पाप फाटक्या वाकळी-सारखं वेशीवरच टांगलं जायचं, हा सिद्धांत आहे. चल माझ्या घरीं.

**कवि** : सिद्धांतशिरोमणे, (बाळासाहेबाकडे बोट दाखवून) तें पाहिलंस का कुलीनांचं कुलसर्वस्व ? ज्वालामुखीसारखं धुम-सत बसलेलं हे कुलीनपणाचं शिखर जर जळती लाव्हा ओकूं लागलं, तर आपण सारींजणं त्यांत पोळून खाक होऊं. चला, मुकाट्यानं घरचा रस्ता सुधारा. ती पोर आहे मूर्ख. तिला एकदां या कुलीनांचा खमंग लीनपणा चाखूं दे. तिखटपणाची मिठी बसली, कीं आपोआप पाण्यासाठीं तुमच्या पाणपोईवर येईल.

**वत्सला** : बाई—बाई—बाई, शर्थ झाली आचरटपणाची !

काय मेलीं तोंडं आहेत कीं नगारे आहेत--आणि तूं रे बाळा-साहेब, तोंडाला खीळ घालूनसा बसला आहेस ?

**हरणी :** अहो, कुणालाच का माझी दया येत नाहीं ? वेशीवरच्या प्रेतासारखी या गिधाडांनीं माझ्यावर धाड केली आहे तें स्त्रीजातीच्या वत्सलतेला मुळींच का दिसत नाहीं ?

**वत्सला :** बाई ग, ज्या दिवशीं तुझं पाऊल वांकडं पडलं त्याच दिवशीं तूं संसाराला मुकलीस. त्याच दिवशीं कुलीनांच्या घरचा तुझा आधार तुटला.

**गतकुल तुला न या जगिं उपाय ।**
**अवगत जनां होसि जयिं पतिता ॥ ध्रु० ॥**
**सकल सायास हरिति न भयास ।**
**सदा जगा निरापगा अपाय ॥ १ ॥**

**हरणी :** आणि हे तुमचे बंधु---**यांचं** वांकडं पाऊल पडलं तरी कुलीनांच्या घरीं त्यांना आश्रय मिळतो ना ?

**वत्सला :** वेडे पोरी, **तो पुरुष आहे** !

**कवि :** पुरुष न नीच कुणी असला । तो तूं बंधु कसा गणिला ? अग ए हरणी, उगीच शिंग कशाला मारते आहेस ? पुरुष हा अखंड पुण्यात्मा आहे. त्यानं कांहीं केलं तरी पुण्यच ! बायकाचं दुर्वर्तन यत्किंचित् जरी असलं तरी त्यानं नरकाचं साम्राज्य उभं राहातं आणि पुरुषाच्या दुर्वर्तनाचे प्रचंड पर्वत पुरुषार्थाच्या साम्राज्याचीं शिखरं उभारतात. बाई, या पुरुषशाहीच्या कालांत तुझ्या पश्चात्तापाला विचारणार आहे कोण ? चल, मुकाट्यानं माणिकरावांबरोबर चल, आणि त्यांच्या बरोबरच स्वतःचंही कल्याण साधून घे.

**हरणी :** नाहीं—त्यांनीं जा म्हटल्याशिवाय मी इथून एक तसूभरही हलणार नाहीं.

**बाबा० :** ( प्रवेश करून ) नीघ—नीघ—कुलांगार पोरी, या क्षणाला माझ्या घराच्या बाहेर निघ.

**बाळा० :** हां—हां—हां—बाबासाहेब, आस्ते कदम. तिला मी इथं घेऊन आलों आहें आणि तिला इथं ठेवण्याचा किंवा घालवून देण्याचा अधिकार माझा आहे.

**बाबा० :** माणिकराव, पाहात काय राहिलांत ? धरा तिचा हात आणि न्या तिला आपल्या—

**बाळा० :** हं ! खबरदार. त्या जागेचं नांव असं गृहस्थाच्या घरांत उच्चारायचं नाहीं हें, बाबा, माझ्यापेक्षां तुम्हांला जास्त समजायला हवं.

**वत्सला :** बाळासाहेब—बाळासाहेब—कुणाला बोलतो आहेस हें ?

**बाळा० :** ज्या एकाच जागीं आम्हीं भेटलों, त्याच जागीं जाणाऱ्या एका कुलीन सद्‌गृहस्थांना बोलतों आहें. वत्सलाअक्का, कांहीं स्त्रीजातीला शोभेल असं वर्तन करा.

**बाबा० :** हरामखोर, माझी अब्रू काढतो ? माझ्या अन्नावर पोसलास—माझ्या अब्रूवर जगलास—माझ्या पैशांवर चैन केलीस आणि आतां माझीच अब्रू बाहेर काढतोस ? माझ्या तोंडाला काळोखी फांसून आपलं तोंड उजळ करूं पाहातोस ? कुठली कोण बाजारबसवी—तिला माझ्या घरांत आणून माझ्या उरावर नाचायला लावतोस ? कुलांगार कारट्या, चांडाळा, पितृद्रोही अधमा, पित्याच्या निंदेनं जिव्हा विटाळ-

तोस ? माणिकराव, न्या त्या कारटीला इथनं ?

**बाळा०** : मी इथं असतांना कुणाची छाती आहे तिला हात लावायची ?

**या सान तनुला लाविला हात चुरिन ॥**
**घात करिन भय नाहीं । निरवधि कवळिन ॥धृ०॥**
**दुर्दम्या हाणीन पदानें । ताडनदानें ।**
**कंपित कोपा असे थार नुरला ॥ १ ॥**

मी तिला तुमच्या उरावर नाचवीत नाहीं. ही पहा--तुमच्या घरांत ती तुम्हांला नको असली तर मीच तिला माझ्या सत्तेच्या खोलीत घेऊन जातों. ( तिला उचलून घेऊन जातो. )

**बाबा०** : हरामखोरा, मागं फिर. माणिकराव, कवि, अरे, त्याला खेंचून बाहेर आणा. ( माणिकराव मोठमोठ्यानें हंसतो. )

**कवि** : हें असंच व्हायचं--

[ पडदा पडतो. ]

# तिसरा अंक

[स्थळ दुसऱ्या अंकांतीलच—बाबासाहेब व वत्सला बोलत आहेत.]

**बाबा०** : असं म्हणतेस ? मोठं आश्चर्य आहे ! तो दुसऱ्याच खोलींत जाऊन बसला ? बरं, त्या पोरीची काहीं जेवणाखाणाची तजवीज केलीस का ?

**वत्सला** : तिचं जेवण ? मरेना का ती ! अन् मी करणार तिच्या जेवणाची तजवीज ?

**बाबा०** : छे: छे:, तूं स्वत: तिला जेवायला वाढ असं नाहीं काहीं माझं म्हणणं, पण म्हटलं, आचाऱ्याला सांगून तिच्या जेवणाची काहीं तजवीज तूं केल्याशिवाय—

**वत्सला** : मी ? मी ? बाबा, कांहीं माणसाची रीत आहे



**बाबासाहेब :** ऐक, आधीं हिला कुठं तरी लपीव. ( पृष्ठ ३९ )

कीं नाहीं तुम्हांला ? त्या बाजारबसवीच्या जेवणाची उठाठेव जर मी करूं लागलें तर मी होऊन आपल्या पायावर धोंडा मारून घेण्यासारखं नाहीं का व्हायचं ? म्हणे, तूं जेवणाची तजवीज कर ! जशी कांहीं जगांतल्या साऱ्या वेसवांसाठीं मी खाणावळच उघडली आहे !

**बाबा०** : वत्से, काहीं माणुसकीची चाड धर. आपल्या घरीं चुकून येऊन पडलेला एक **निराधार जीव** म्हणून तरी तिची दया कर. भरल्या घरांत सगळीं माणसें जेवावीं आणि एक जीव उपाशीं रहावा—

**वत्सला** : एकच का ? बाळासाहेब कुठं जेवला आहे ?

**बाबा०** : ( ताडकन् उठून ) म्हणजे ? बाळहीं जेवला नाहीं ? आणि आम्हीं सारीं माणसं मात्र खुशाल ढेकरा देत बसलों आहोंत ? वत्से, आतां मात्र कमाल झाली ! निर्दय-पणाची शिकस्त झाली ! तुम्हीं बायका आहांत कीं आहांत तरी कोण ?

**वत्सला** : आम्हीं बायकाच आहोंत. अन् **आम्हीं बायका** आहोंत म्हणूनच तुमच्या घराण्याची अब्रू झांकून ठेवतों आहोंत. तुम्हीं पुरुषांनीं वाटतील तीं पापं केलीं, तरी त्यांच्यावर पांघरूण पडतं आहे, तें आम्हीं बायका आहोंत म्हणूनच. आम्हीं बायका छत्रासारख्या तुम्हां पुरुषांवर पाखर घालतों आहोंत, म्हणून तर तुम्हांला जगांत उजळ माथ्यानं वावरतां येतं आहे. आम्हीं बायका या अशा नसतों—

**बाळा०** : ( प्रवेश करून) तर पुरुषांची जात अशी बेफाम आणि बेमुर्वत मुळींच झाली नसती. आक्कासाहेब, बायकांच्या

जातीच्या मोठेपणाचे पोवाडे ऐकतां ऐकतां आतां आमचे कान किटत आले. बायकांच्या जातीचा मोठेपणा नुसता **ऐकायला** मिळण्यापेक्षां जर थोडासा **पाहायला** मिळाला असता तर फार बरं झालं असतं.

**बाबा०** : बाळ, तूं अझून जेवला नाहींस !

**बाळा०** : जेवलों नव्हतों एवढा वेळ, पण आतां बाजारांतून आणून थोडं खाल्लं. या बायकांच्या कुलीन जातीनं आमच्यावर बहिष्कार पुकारला आहे ना !

**बाबा०** : आणि—ती—त्या—तिला—

**बाळा०** : हं—हं—त्या तिलादेखील घातलं थोडं खायला. **मोलकरीण** सुद्धां बाजारांत जायला तयार होईना—शेवटीं गड्याला सांगितलं—

**वत्सला** : मींच सांगितलं होतं मोलकरणीला तसं. त्या तसल्या सटवीला जर या घरांत सोकावूं दिली, तर उद्यां कायमची वस्ती करून राहील ती इथं. तें नाहीं खपायचं मला.

**बाळा०** : पण हा सटव्या तिची काळजी घ्यायला इथं आहे हें कसं विसरलीस ? समज, गड्यानं नाहीं म्हटलं असतं, तर मला स्वत: जातां आलं असतं दुकानावर.

**वत्सला** : तेंच तर मला पाहिजे होतं. अगदीं खडा पहारा करीत बसला आहेस तिच्यावर, तो जरा बाहेर गेला असतास, कीं भय्याकरवीं तिला पोलिसच्या हवालीं केली असती. पण त्या मेल्या गोप्यानं घात केला !

**बाळा०** : खरं आहे. पुरुषाला दया आली. **गडीच** होता तो—तुम्हां गृहस्थांसारखा प्रतिष्ठित झब्बू नव्हता.

**बाबा०** : वत्से, काय हा निर्दयपणा ! बाळासाहेबांचं करणं देखील मला आवडलं नाहीं खरं, पण दारीं आलेल्या भुकेल्या जीवाला एक गोळाभर अन्नाचीही नाकेबंदी व्हावी ? आणि तीही तुझ्यासारख्या एका स्त्रीकडून ? ही मोठी नामुष्कीची गोष्ट आहे. यांत माझ्या घराची अब्रू राखलीस असं तुला वाटलं असेल, तर तें साफ चुकीचं आहे.

**वत्सला** : आतां तुम्हीही फिरलांत ? खरंच आहे तें— ज्याच्यासाठीं मरावं त्यानंच उलट मार द्यावा, हा जगाचा न्यायच आहे. तुम्ही तरी कसे त्याच्या विरुद्ध जाल ! करा, वाटेल तें करा—मी आपली इथून निघूनच जातें कशी ! (जाते.)

**बाबा०** : ( कांहीं वेळ दाराकडे पहात स्वस्थ राहातात व नंतर ) बाळासाहेब, झाल्या या साऱ्याच गोष्टी बऱ्या झाल्या नाहींत. बाहेर कांहीं मसणांत गेलं तरी घरीं कुलाचार पाळले पाहिजेत. आतां काय करणार आहांत ?

**बाळा०** : काय करणार आहें तें प्रत्यक्ष दाखवीन. नुसती तोंडची वाफ निष्कारण दवडायची मला संवय नाहीं.

**फसलि अबला ।**
**अजाण बालपणें बुडे बिचारी ॥ ध्रु० ॥**
**जगत विसरलें ।**
**पुरुषगुणाला ।**
**पाहिना सुखि नारी ॥ १ ॥**
**अमर करणिनें ।**
**दिपविन जगता ।**
**पाहुंया कुणि भारी ॥ २ ॥**

**बाबा०** : कांहीं तरी भलताच अविचार करूं नका म्हणजे झालं. मलाही त्या पोरीची दया येते, पण दया दाखवायचा प्रकार हा नव्हे. हें **घर** आहे, हें विसरून चालणार नाहीं--

**बाळा०** : आणि म्हणूनच आश्रयासाठीं तिला मी **या घरांत** आणलं.

**बाबा०** : पण **तिला** आश्रयासाठीं आणायचं घर हें नव्हे. हें **कुलीन** गृहस्थाचं घर आहे.

**बाळा०** : एखादं **अकुलीन गृहस्थाचं** घर दाखवाल का मला ? अकुलीन **स्त्रियांचीं** घरं मला माहित आहेत, पण अकुलीन **पुरुषाचं** घर असल्याचं अजून माझ्या पाहाण्यांत आलं नाहीं.

**बाबा०** : आतां असा हा तेढा बोलूं लागलास ! काल मी तुला रागानं बोललों म्हणून आज त्याचं वाईट वाटलं. म्हटलं, आज सामोपचारानं सांगून पाहीन; पण तुला त्याचं कांहींच वाटत नाहीं. अजून घराच्या कर्तेपणाचा अधिकार **माझा** आहे. तूं **कर्ता** झाला आहेस खरा; पण प्रपंचाचीं सूत्रें **अजून** तुझ्या हातीं दिलीं गेलीं नाहींत. मी हयात आहें तोंपर्यंत तरी तुला माझी आज्ञा पाळली पाहिजे.

**बाळा०** : बाबासाहेब, मुलगा सज्ञान झाला म्हणजे प्रपंचाचीं सूत्रं जरी त्याच्या हातीं आलीं नाहींत तरी कर्तेपणाचा त्याचा अभिमान मात्र जागा होतो. त्या जागत्या अभिमानाला दाबायला वडिलांचं वडीलपण यत्किंचितही समर्थ होत नाहीं. आणि कुणी एखादा माणूस वडिलपणाच्या जोरावर त्या अभिमानाला दडपूं पाहील तर उलट त्यालाच दडपून टाकण्याचं

सामर्थ्य त्या अभिमानात आलेलं असतं. प्रत्येक तरुणाला या गोष्टीची जाणीव असते, पण तो बोलून मात्र दाखवीत नाहीं. मी जरा फाजील प्रामाणिक असल्यामुळं उघड उघड बोलून दाखवतों आहें, इतकंच !

**बाबा०** : त्यापेक्षां उघड उघड माझ्या थोबाडींतच मारीनास ? ही तुझी तंबी मला चांगली कळते. असल्या धमकावणीला भीक घालणारा मी नव्हे, हें खूप ध्यानांत ठेव.

**बाळा०** : मीही आपलाच मुलगा आहें. कसल्याही धमकावणीला भीक घालणारा मी नाहीं, हें अनुभवानंच आपल्याला कळून येईल. आतां हेंच पहाना—(केसर येते.) नाहीं—आधीं ही आली आहे—नव्हे ह्या आल्या आहेत. यांनाच पहा—

**केसर** : बंदगी– बाळासाहेब—बंदगी—

**बाळा०** : हें काय आईसाहेब, आपला अधिकार आमचा नमस्कार **घेण्याचा** आहे. आपण आमच्यापुढं मान वांकवायची नाहीं. येतों बाबासाहेब, येतों आईसाहेब—दार लावून घेऊं का जातांना ? ( जातो. )

**बाबा०** : केसर काय हें ? अगदीं घरीं आलीस माझ्या ?

**केसर** : मींच काय पाप केलं आहे ? त्या पोरीला घेऊन बाळासाहेब आले—माझी नाहीं वाटतं सत्ता या घरावर ? पाहातां काय ? कधीं पाहिलं नव्हतंत मला !

**बाबा०** : केसर, माझी **मुलगी** इथं आहे. जा—जा—तें दार लाव. ( ती दार बंद करते. ) आणि हें इकडचंही लाव. ( ती तसें करते. )

**केसर :** काय बरं हें ! असलं सोन्यासारखं घर—अन् मला त्याची सावली सुद्धां लागूं दिली नाहीं आजपावेतों. त्या तसल्या गटारखान्यांत मी राहावं अन आपण या राजवाड्यांत ऐषआराम भोगावे, हें आवडलं ना आपल्या मनाला !

**बाबा॰ :** केसर--हात जोडतों, आल्या पावलीं आपल्या घरीं जा पाहूं.

**केसर :** मी नाहीं जाणार ! हा असा सुंदर बंगला समोर असतांना मी नाहीं जाणार त्या मसणांत ? अश्शी इथं बसेन आपल्या शेजारीं.

**बाबा॰ :** आतां काय करावं हिला ? अग, माझी मुलगी येईल तर पाहील ना ?

**केसर :** मग पाहील. काय झालं पाहिलं तर ? मुलानं पाहिलं ना ? आतां मुलगी पाहील.

**बाबा॰ :** मुलानं पाहिलं खरं पण तो मुलगा आहे-- मुलीची गोष्ट तशी नाहीं. आतां तुझी समज तरी कशी घालूं ?

**केसर :** काहीं नको समज घालायला. मी नाहीं जाणार —अगदीं प्राण गेला तरी इथनं जाणार नाहीं. सर्वांना ठाऊक आहे, मग तिलाच कळलं नाहीं असं कसं होईल ?

**बाबा॰ :** आहे—तिलाही ठाऊक आहे. पण दृष्टीआड सृष्टी. समोर नाहीं पाहावायचं तिच्याच्यानं. त्रागा करून घेईल जिवाचा. मोठी आतताई पोर आहे—

**केसर॰ :** भावावरून दिसतंच आहे की ! असं काय गडे—मी राहाणार—अं:—मी नाहीं जायची. एकदां काय होतं तें पाहूं. अन् ती तरी अशी कुठं कायमची राहाणार आहे

इथं ? जाईल उद्यां सासरीं. मी आतां सासरीं आलें आहें—कळलं का ?—मी **सासरीं** आलें आहें. कंटाळलें बाई त्या सदाच्या माहेरवासाला.

**बाबा०** : आतां काय करूं ?—असं पहा, आधीं त्या पोरीला सासरीं पाठवतों आणि **मग** वाटलं तर तूं इथं ये राहायला.

**केसर** : वाटलं तर कां ? मी आतां आलें आहें ती आलेंच आहें. मला पाहिलें कीं ती जाईल आपाप माहेरीं—

**बाबा०** : तेंच नको ना व्हायला—(कुणी दार ठोठावतें.) आतां काय करूं ? ( आंतील दार उघडून ) बाळ—बाळ—अरे बाळ्या—

**बाळा०** : ( प्रवेश करून ) काय बाबा, या एकांतांत हा आकांत कां ?

**बाबा०** : गाढवा, आधीं ऐक. हिला आंत कुठं तरी लपीव. ( पुन्हां दार वाजतें. ) आलों—आलों—ऐकलंस, हिला लपीव-पण वत्सेच्या दृष्टीला पडूं देऊं नकोस आलोंच. घाई कर—वत्सेच्या दृष्टीला—

**बाळा०** : त्याची नको काळजी. हरणीच्याच खोलींत नेतों हिला—आक्का तिकडे फिरकायचीसुद्धां नाहीं. यावं. आईसाहेब —असं इकडून यावं.

**केसर** : ( हंसून वेडावून दाखवून ) आतां तुम्हीं होऊनच घरांत जाऊं दिलंत कीं नाहीं ? आतां जी आलें ती आऽऽऽऽऽ लें ! ( दोघें जातात. )

[ बाबासाहेब दार उघडतात—एडिटर येतो. ]

**बाबा० :** ओहोहो, एडिटरसाहेब, आज इकडे कुणीकडे आपला मोर्चा वळला ?

**एडिटर :** माझ्या जागीं दुसरा कुणी असता तर त्यानं म्हटलं असतं, कीं आपला आलों सहज म्हणून. पण तें माझं ब्रीद नाहीं. सत्य हा माझा बाणा आहे आणि त्यासाठींच मी लेखणी हातीं धरली आहे. सत्यासाठींच माझं तोंड उघडेल आणि सत्यासाठींच माझे डोळे मिटतील.

**बाबा० :** खरं आहे. पण कोणत्या सत्यासाठीं तुमचे पाय इकडे वळले ?

**एडिटर :** मित्रकार्यासाठीं. माणिकरावांना व्याख्यानासाठीं जायचं होतं आणि अगदीं निघायच्या वेळीं त्यांच्या नजरेला आलं कीं—हाय ! केसर घरीं नाहीं. कर्तव्य आणि देशसेवा या दोहोंमध्यें त्यांचा जीव टांगला गेला. एवढ्याचसाठीं आजचं लीडर लिहून धांवतच इकडे आलों. परत जातांना तुमची मोटार मिळेल ही खात्री असल्यामुळं पायींच चालत आलों.

**बाबा० :** पण केसर घरीं नाहीं म्हणून तुम्हीं इथं कां आलांत ?

**एडिटर :** दुसऱ्या कुठं जाणार ? प्रणयिनी घरांतून बाहेर निघाली तर ती आपल्या वल्लभाखेरीज दुसऱ्या कुठं जाणार ?

**बाबा० :** अशींच अंदाजानं वर्तमानपत्रं चालवतां वाटतं ? तेव्हांच तुमची पदोपदीं फटफजिती होते ती ! केसर इथं कशी येईल ?

**एडिटर :** कदाचित् चालत येईल—कदाचित् गाडींतून येईल—

**बाबा०** : चालत नाहीं आणि गाडींतूनही नाहीं. ती मुळींच इथं आली नाहीं.

**एडिटर :** असं कसं होईल ? तिनं जातांना मोलकरणीला सांगितलं कीं मी इकडेच जातें आहें म्हणून. केसरसारखी गुणवती स्त्री खोटं कसं बोलेल ?

**बाबा०** : तर काय **मी** खोटं बोलतों ? जा—जा—एडिटर, पुन: एकदां तिकडेच जाऊन पहा. गेली असेल अशीच कुठं तरी बाहेर.

**माणिक०** : (प्रवेश करून) छे: छे: मुळींच नाहीं. मी आतांच हा तिकडून आलों. व्याख्यान देखील आटोपतं घ्यावं लागलं. काय हो एडिटरसाहेब, तुम्हीं **आतां** इथं येतां आहांत वाटतं ! दीड घंटा झाला तुम्हांला जा म्हणून सांगितल्याला--

**एडिटर** : कर्तव्य—माणिकराव—आधीं ड्यूटी. लीडर ल्याहायचं होतं. केव्हां कां होईना—पण आलो कीं नाहीं कबूल केल्याप्रमाणं !

**माणिक०** : बाबासाहेब, केसर कुठं आहे ?

**बाबा०** : माणिकराव, हें गृहस्थाचं घर आहे—इथं असल्या बायका येत नसतात.

**माणिक० :** मग काल आपल्या चिरंजीवांनीं आणली आहे ती कोण ?

**बाबा०** : ती **आणली** आहे, **आली** नाहीं.

**माणिक०** : हिलाही **तुम्हीं** आणली नसेल कशावरून ? मीं तिचा पालक आहें, हें तुम्हांला विसरून चालायचं नाहीं. यायचं असेल तर **तिथं** या—पण तिला **इथं** आणलेलं मला मुळींच

खपायचं नाहीं.

**बाबा०** : पण ती जर इथं आलीच नाहीं तर हा तुमचा अट्टाहास कशाला? ती आली नाहीं आणि मी होऊन तिला इथं केव्हांही आणणार नाहीं.

**माणिक०** : तें कांहीं नाहीं. ती इथंच आहे आणि या क्षणीं तिला तुम्ही इथं हजर केली नाहीं तर—

[ वत्सला केसरला एका हातीं व हरणीला दुसऱ्या हातीं धरून प्रवेश करते. ]

**वत्सला** : ही घ्या—आणि हीही घ्या. मेल्या सटवाया शिरल्या घरांत एकामागून एकेक—( बाळासाहेब येतो. ) बरं झालं बाबा, मला वेळींच सांगितलंस तें !

**पांडिटर** : अहो सत्यवचनी धर्मराज, निदान 'नरोवा कुंजरोवा' तरी करायचं होतं. अगदीं सपशेल खोटं बोललांत कि हो !

**माणिक०** बाबासाहेब, काय होता आपला विचार? स्पष्ट बोला—माझ्या व्यवसायावर धाड घालायचा विचार होता आपला? सभ्य समजून आपली सोयी केली ती माझा असा गळा कापण्यासाठीं का? ( बाळासाहेब हंसतो. ) हंसतां काय बाळासाहेब? यांत तुमचंही अंग आहे तर?

**केसर** : त्यांचं अंग असतं तर त्यांनीं कशाला चुगली केली असती या बयेकडे? माणिकराव, एवढं थैमान कसलं मांडलं आहेत हें? काय झालं मी इथं आलें म्हणून?

**माणिक०** : काय झालं? शिस्त मोडली. त्यांनीं **तिथं** आलं पाहिजे—तूं नाहीं यायचं **इथं** !

**बाळा॰ :** बाबासाहेब, स्वस्थ कां बसलांत ? कांहीं उत्तर द्या ना !

**बाबा॰ :** गप्प बैस मूर्खा, तुझ्यामुळं हा सारा प्रसंग ओढवला !

**बाळा॰ :** तेंही खरंच आहे. हरणीला मी आणली नसती तर ही तरी कशाला इथं आली असती ?

**माणिक॰ :** चल केसर, आतांच्या आतां माझ्याबरोबर चल.

**केसर :** ( धावत जाऊन बाबासाहेबांना मिठी मारते. ) नका हो नका—या चांडाळाच्या हातीं मला देऊं नका.

**वत्सला :** देवा—देवा—एवढंच पाहाण्यासाठीं का मला माहेरीं यायची बुद्धि दिलीस ?

**केसर :** अहो तिचं ऐकूं नका. ती आज इथं आहे—उद्यां सासरीं जाईल. पण मला या चांडाळाच्या कैचींत दिलंत तर माझ्या जन्माचा मात्र सत्यनाश होईल.

**बाबा॰ :** ठीक आहे, केसर, तूं इथंच रहा. आतां जगाची चाड तरी किती बाळगायची ?

**एडिटर :** पहातां काय माणिकराव, ओढा त्या हरणीला ! व्यवसायाच्या दृष्टीनं हिच्यापेक्षां तीच बरी आहे.

**माणिक॰ :** अगदीं बरोबर आहे. हरणी—( तिला धरायला जातो. )

**बाळा॰ :** ( त्याला धक्का देऊन ) अबे बदमाष, कुणाला हात लावतोस ?

**माणिक॰ :** या—या—बिनवारसी इस्टेटीला—

**बाळा०** : ती बिनवारसी नाहीं—ती माझी धर्मपत्नी आहे.

**माणिक०** : काय ? तुमची **धर्मपत्नी** ?

**बाळा०** : हो—हो—माझी धर्मपत्नी !

**एडिटर** : धर्मपत्नी ? केव्हां लग्न झालं ? ( टिपणवही काढतो. ) कुठं झालं ? कोणत्या मुहूर्तावर ? उपाध्या कोण होता ? साक्षीदार कोण ? सांगा—सांगा—लग्नाची हकिकत तपशीलवार सांगा—

**बाळा०** : ज्या मुहूर्तावर राजा दुष्यंतानं शकुंतलेचं पाणिग्रहण केलं त्याच मुहूर्तावर, त्याच धर्मविधीनं, त्याच उपाध्यानं, त्याच साक्षीदारांसमक्ष माझं लग्न लावलं. या भारत-वर्षाला जिच्या मुलाचं नांव मिळालं आहे, त्याच शकुंतलेप्रमाणं हिचा माझ्याशीं विवाह झाला आहे.

**एडिटर** : पण याला कोणत्या स्मृतीचा आधार आहे ?

**बाळा०** : पराशरस्मृतीचा.

**माणिक०** : पराशरस्मृतीचा ? पराशरस्मृतीला गांधर्व-विवाह संमत नाहीं.

**बाळा०** : स्मृतीला संमत नसेल पण पराशराला तर होता ? याला आधार भरल्या नदींत होडी वल्हवणाऱ्या सत्यवतीचें कौमार्य भंग करणाऱ्या पराशराच्याच स्मृतीचा नव्हे—कृती-चा ! त्याच विधीनं मी हिच्याशीं विवाह लावला. समजलांत ? प्रत्यक्ष तिच्या मुलानं—व्यासानंच ही बखर केली आहे. तो व्यासच माझा आधार. मुलगा कधीं बापाची बदनामी करील ?

**बाबा०** : आणि तूं हें काय चालवलं आहेस ?

**बाळा० :** व्यासाचं अनुकरण—

**माणिक० :** चूप—ऋषिमुनींचीं नांवं घेऊन कसल्या बढाया मारतोस ?

**वत्सला :** बाळासाहेब—बाळासाहेब—काय केलंत हें ? या व्यभिचारिणीशीं लग्न लावून कुळाचं नांव नरकांत लोटलंत !

**हरणी :** मी व्यभिचारिणी—पण हे कोण ? हे नाहींत का व्यभिचारी ?

**वत्सला :** अग, पण **तो पुरुष आहे ना ?**

**हरणी :** आणि असल्या व्यभिचारी पुरुषांशीं तुम्ही एखाद्या सोज्वल कुमारिकेचं लग्न लावून देणार ? बारा रात्रींत बाराशें उंबरठे झिजवणाऱ्या या पुरुषाचा सडका हात एका अजाण, असहाय, आईबापांच्या खुळ्या इच्छेला विनतक्रार मान वांकवणाऱ्या, एखाद्या निर्मळ, अव्याज कुमारिकेच्या हातीं देणार ? आग लागो तुमच्या पुरुषांच्या अभिमानाला !

**कवि :** ( प्रवेश करून ) बाबासाहेब, घात झाला.

**सर्व :** काय झालं ?

**कवि :** एका अनाथ विधवेला फुसलावून पळवून आणल्याच्या आरोपावरून आत्तांच पोलिसांनीं बोरीबंदरवर आपल्या जांवईबोवांना गिरफदार केलं.

**वत्सला :** हाय रे देवा. ( मूर्च्छित पडते )

**बाबा० :** अरे तिला कुणी सावध करा. हरहर ! काय हा प्रसंग ! ( मटकन् खालीं बसतो. माणिकराव तिला सावध करण्यासाठीं पुढें सरसावतो. बाळासाहेब त्याला दूर लोटतो. )

**बाळा० :** दूर हो चांडाळा—हरणी, तिला वारा घाल-

( हरणी तसें करते. )

**माणिक०** : मी चांडाळ--आणि एडिटरसाहेब, ही पंढर-पुरची वारी केलेली मुसळदेवता झाली महापतिव्रता ! तस्मात् काय ?--

**कवि** : नेपाळेश्वरभालभचिबल्ला कस्तूरिका मानिती !

**वत्सला** : ( उठून बसून ) खरंच का हो त्यांना पोलि-सांनीं पकडलं ?

**बाळा०** : असं कां विचारतेस ? त्यांना विचार—खरंच काहो त्यांनीं एका विधवेला भ्रष्ट केलं ?

**वत्सला** : आतां दुःखावर जितक्या डागण्या द्यायच्या असतील तितक्या देऊन, घ्या एकदां जिवाचं समाधान करून.

**हरणी** : बाईसाहेब, दुःख काय तें तुम्हांलाच होतं ? दुसऱ्या कुणाला होत नाहीं ? काल ' व्यभिचारी--व्यभिचारी ' म्हणून माझा हात धरून मला घराबाहेर खेंचून काढणार होतां आणि आतां ?--उद्यां वर्ष सहा महिने डोंगरीची हवा खाऊन येणाऱ्या पतिराजांना तसंच हात धरून खेंचून घराबाहेर काढाल का ?

**वत्सला** : तसं कसं होईल--ते **माझे पतिदेव** आहेत !

**बाळा०** : पतिदेव म्हणे पतिदेव ! तुम्हीं बायकांनींच पुरुषांना चढवून ठेवलं आहे. पातिव्रत्याच्या नांवाखालीं तुम्हीं बायकांनीं चालवलेला हा नेभळेपणा आम्हां पुरुषांना पापाच्या कर्दमांत लोळायला उत्तेजन देतो आहे. कुणी पुरुष दुसऱ्याचा गळा कापीत असला, तर तुम्हीं स्त्रिया त्याचा हात धरणार नाहीं—कां ?—तर तो पतिदेव म्हणून ! दारूचा पेला हातीं

घेऊन नरकाचा मार्ग चोखाळणाऱ्या पतीच्या हातावर तुम्हीं ताड्कन् हात कां मारणार नाहीं ?—तर तो पतिदेव म्हणून ! बारा उंबरठ्यांचं बारसं उजवून मध्यान्हरात्र उलटल्यावर घरीं परतणाऱ्या पुरुषाच्या पापी कंबरड्यांत तुम्हीं लाथ कां हाणणार नाहीं ?—तो पतिदेव म्हणून ! आणि मग हीं असलीं पतिदैवतं तुम्हांला पायाखालीं तुडवूं लागलीं म्हणजे कशाला धायधाय रडतां ? या असल्या सडलेल्या पतिदैवतांना पाठीवर बांधून वेश्येच्या घरीं घेऊन जाणाऱ्या बायकोच्या. शापानं म्हणे सूर्य उगवायचा थांबतो ! आणि अशा बेछूट गप्पा मारणारीं पुस्तकं हीं तुमच्या पातिव्रत्याचीं कायदेबुकं ! धिक्कार असल्या या नेभळ्या वृत्तीला आणि असल्या नेभळी वृत्ती आणणाऱ्या ग्रंथांना !

**माणिक०** : चूप बैस मूर्खा, आमच्या पवित्र आर्यसंस्कृतीची अशी निंदा करतोस ? लाज नाहीं वाटत ?

**बाळा० :** मी बोलून चालून निर्लज्जच आहें. नादान गुलामगिरीला पातिव्रत्य म्हणण्याइतका बायकी लज्जाशीलपणा अझून मी शिकलों नाहीं.

**वत्सला :** देवा—देवा—आणखी काय काय ऐकायचं माझ्या नशिबीं ठेवलं आहेस ?

**बाळा०** : बाबासाहेब, ही केसर इथंच राहाणार ?

**केसर** : अहो—होय म्हणा.

**बाबा०** : ( जोरानें ) होय.

**बाळा०** : तर मग हिच्याशीं लग्न करा

**माणिक०** : हिच्याशीं ?

**बाळा०** : होय—हिच्याशीं.

**कवि** : ( गातो. )

**‘करूं नको संकोच। पांखरा। करूं नको संकोच ॥ ध्रु० ॥**
**पिकलें फळ हें तुझियासाठीं। खुपस आपली चोंच ॥१॥’**

**माणिक०** : काय बरळतोस मूर्खा!

**कवि** : बरळणं ?—अहो, हें आमच्या एका आवडत्या कवीचं एक काव्य आहे. माझं नव्हे हें काव्य !

**बाळा०** : गप्प बैस—बाबासाहेब, काय ठरला विचार? ( बाबासाहेब नुसता हंसतो. केसर त्याला बिलगते. ) बाळासाहेब, प्रामाणिकपणाची तुम्हांला ओळख तरी आहे का ?

**वत्सला** : बाळासाहेब, पातिव्रत्याची विटंबना केलीस तेवढी पुरे नाहीं का झाली ? असल्या **वेसवेशीं लग्न करून** नवऱ्याला पातिव्रत्याचा कोणता ठेवा लाभणार ?

**हरणी** : आणि लग्न **न** करून आतांपर्यंत बाहेर होती तशी आतां फार तर घरांत येऊन राहिली, तर मात्र तुमची आर्यसंस्कृति बुडत नाहीं; असंच ना ?

**वत्सला** : आतां काय बोलशील तें रोज ऐकून घ्यावं लागणार ?

**हरणी** : नाहीं—नेभळट पातिव्रत्याच्या सोनेरी छायेंत सडत राहाण्यापेक्षां जाऊन समुद्रांत जीव दिलेला काय वाईट ?

**बाळा०** : हा बाळासाहेब तुझा पती आहे. हरणी, पापाच्या कर्दमांत लोळण्यासाठीं आजपर्यंत मी वडिलांच्या शिस्तीला जुमानलं नाहीं, देहाच्या सुखाकडे पाहिलं नाहीं, मनोदेवतेची प्रत्यक्ष डांचणी कानीं घेतली नाहीं आणि जगानें माझे वाभाडे

काढले तरी बेपर्वाईनें जगाला पायाखालीं तुडवलं. त्याच **बेपर्वाई-च्या बळावर** हरणी, आज या सर्व लोकांसमक्ष मी तुझं पाणिग्रहण करीत आहें.

**हरणी :** नको—बेइमान पुरुषजातीचा यापुढं संपर्कही नको.

**नर घाटे राक्षस जाहला ॥ धृ० ॥**
**तुडविल्या अडवोनि काननीं ।**
**चपलशा अबला कुरंगिनी ।**
**निराशा जिवा शापरूपा मला ॥ १ ॥**

**बाळा० :** नाहीं हरणी, या नेभळट बायकांप्रमाणें तूं माझ्या 'चरणांची दासी' होऊन राहूं नकोस. सुखांत आणि दुःखांत, श्रीमंतींत आणि गरीबींत, वाड्यांत किंवा झोंपडींत—सर्व स्थितींत, सर्व कालांत, समान हक्कानं राहण्यासाठीं आपण आनंदानं जाऊं चल—

**हरणी :** आणि कदाचित तुमचं मन पालटलं—माझ्या पूर्वकर्माची जाणीव तुम्हांला डांचूं लागली आणि तुम्हीं माझा त्याग केला, तर—

**बाळा० :** तेवढ्यासाठींच सिव्हिल मॅरेज ॲक्टप्रमाणें लग्न रजिस्टर करून घेऊं. म्हणजे ब्राह्मविवाहाच्या लग्नाप्रमाणें वाटेल त्यावेळीं तुझा अकारण त्याग करणं मला अशक्य होईल.

**बाबा० :** बाळासाहेब, माझ्या कुलाला कलंक लावणारं हें लग्न केलंस तर मी माझ्या इस्टेटीवरचा तुझा वारसाहक्क दूर करून टाकीन.

**बाळा :** ठीक आहे. या सोनेरी तुरुंगाचीं कपाटें फोडूनच

मी निघतों आहें. बाबासाहेब, तुमच्या कपाटाची शोभा वाढवणारं हें मोरोक्को लेदरचं पुस्तक यापुढं या सोनेरी कपाटांत केव्हांही दिसणार नाहीं. चल, हरणी. ( दोघें जातात. )

**कवि :** शुभ मंगल सावधान. ( जातो. )

**एडिटर :** चला—चला—माणिकराव, आधीं त्यांचा फोटो घेऊं. उद्यांच्या अंकाला केवढं मोठं सेन्सेशन मिळेल !

[ दोघे जातात. ]

**बाबा० :** गेले सारे ? ठीक आहे. केसर, ये आतां माझ्या मांडीवर बैस.

**केसर :** पण ही आहे ना इथं ?

**बाबा :** अंः—ती आहे एक कुलीन स्त्री. कुलीन स्त्रिया आपल्या घरची अब्रू चव्हाट्यावर नेत नाहींत. ये—या मांडीवर बैस.

[ केसर त्यांच्या मांडीवर बसते. ]

**वत्सला :** हाय रे दैवा ! काय मी हें पाहातें आहें ! ( मूर्च्छित पडते. )

[ पडदा पडतो. ]